कवी श्यामराजकृत

# राजगोपालविलास

संपादक :

**प्रा. माणिक धनपलवार**, एम्. ए.
मराठी विभाग
उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद.



**मराठी विभाग, उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद.**

१९७४

# अनुक्रम

# निवेदन

'राजगोपालविलास' हे आख्यानकाव्य रसिक-विद्वानांपुढे सादर करताना एक आगळे समाधान वाटत आहे. ह्या ग्रंथाच्या प्रकाशनाने महाराष्ट्र-सारस्वताला एका नव्या कवीचा परिचय घडत आहे.

तंजावरकडील मराठी साहित्य अनेक प्रवाहांनी समृद्ध आहे, व ही समृद्धता वैशिष्टयपूर्ण आहे. कारण येथील मराठी साहित्याच्या निर्मितीवर दाक्षिणात्य भाषा व संस्कृती यांचा फार मोठा प्रभाव पडलेला आहे. भक्तिऐवजी श्रृंगाराला प्राधान्य देणारे 'दमयंती-स्वयंवरा'सारखे काव्य येथे निर्माण व्हावे हा केवळ योगायोग नसून संस्कृत-परिष्कृत भाषिक वातावरण व तेलुगु साहित्याचा संपर्क यांचे ते फलित होय असेच म्हणावे लागते. तेलुगु 'प्रबंध-काव्या'चे अनेक विशेष मराठीने आत्मसात केले आहेत. प्रस्तुत 'राजगोपालविलास' हे याच महाकाव्य-सदृश प्रबंध-परंपरेतील काव्य होय. यादृष्टीने त्याचे प्रकाशन महत्त्वपूर्ण ठरावे.

१९७१-७२ मध्ये उस्मानिया विद्यापीठाच्या अनुदानाने तंजावरला जाण्याची संधी मिळाली व अन्य हस्तलिखितांबरोबर हा काव्यग्रंथही अभ्यासिता आला. या हस्तलिखिताची यथामूल प्रत मी स्वतःच केली व इतर त्रुटित प्रतींच्या नकला तेथील लेखनिकांकडून करवून घेतल्या. तंजावरच्या वास्तव्यात त्याच्या परिसरातील कांही क्षेत्रे पाहण्याचा योग आला. इतर अनेक स्थळांबरोबर मन्नारगुडीच्या राजगोपालाचे दर्शन–प्रस्तुत काव्याच्या संदर्भात–विशेष अर्थपूर्ण वाटले. तिकडील सांस्कृतिक जीवनाचेही या निमित्ताने बरेच जवळून दर्शन घडले. दाक्षिणात्य संस्कृतीच्या व साहित्याच्या अंगोपांगांचा सूक्ष्म अभ्यास केल्याशिवाय तंजावरकडील समृद्ध मराठी साहित्यातील विविध प्रवाहांची संगती लावता येईल असे वाटत नाही.

प्रस्तुत ग्रंथाचे संपादन करताना अनेकांचे सहकार्य लाभले. डॉ. श्री. रं. कुळकर्णी, मराठी विभाग–प्रमुख, उ. वि. यांच्या सूचनांचा उपयोग झाला संशोधन-कार्याविषयी त्यांना असलेली आस्था याला तोड नाही. ह्या ग्रंथाची संहिता-सिद्धी, प्रस्तावना इत्यादी बाबतीत प्रा. भा. शं. कहाळेकरांचे मोलाचे वा महत्त्वपूर्ण मार्गदर्शन लाभले. शारीरिक अस्वास्थ्य असूनही त्यांनी काव्यासंबंधी अनेक वेळा चर्चा करून अभ्यासाची दिशा दाखविली. या गुरुतुल्य दोन्ही विद्वानांच मी ऋणी आहे.

प्रा. श्री. ना. बनहट्टी हे मराठीतील एक ज्येष्ठ असे निष्ठावंत, साक्षेपी संशोधक म्हणून विख्यात आहेत. तंजावरला त्यांच्याशी झालेल्या परिचयाचा लाभ घेऊन त्यांना 'पुरस्कार' लिहिण्याची विनंती केली. त्यांनी 'पुरस्कार' लिहून जे प्रेमळ प्रोत्साहन दिले, त्याबद्दल मी त्यांचा कृतज्ञ आहे.

माझे स्नेही संस्कृतचे प्राध्यापक डॉ. प्रमोद लाळे, प्रा. प्रल्हाद डाके व प्रा. गोपाल रेड्डी यांनी आपुलकीच्या पोटी विविध प्रकारे साहाय्य केले. तेलुगूचे प्राध्यापक डॉ. पी. दुर्गय्या, डॉ. एम्. कुलशेखरराव व श्री. इ. कृष्णमूर्ती यांनी तेलुगू साहित्यासंबंधी उपयुक्त माहिती पुरविली. माझे मित्र तामिळचे प्राध्यापक श्री. एस्. एस्. मुरुगन ह्यांनी मोठ्या प्रयत्नाने आवश्यक ती छायाचित्रे उपलब्ध करून दिली. या सर्वांचा मी मन:पूर्वक आभारी आहे.

तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयाचे भूतपूर्व कार्यवाह श्री. एन्. कंदास्वामी पिल्ले, भूतपूर्व ग्रंथपाल श्री. व्ही. गोपाल अय्यंगार व मराठी विभागाचे पंडित श्री. टी. एस्. भीमराव या सर्वांचे सहकार्य लाभले. तंजावरच्या मुक्कामात त्यांनी आवश्यक ती संशोधन-सामग्री हाती दिली. सरस्वती महाल ग्रंथालयाच्या प्रशासक समितीने प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनास अनुमती दिली. तिरुवारूरच्या त्यागराजस्वामी देवस्थानचे कार्यकारी अधिकारी श्री. बी. कृष्णस्वामी यांनी तिकडील कांही क्षेत्रासंबंधीचा तपशील पुरविला. या सर्वांचा कृतज्ञतापूर्वक निर्देश करणे माझे कर्तव्य आहे.

प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनास विद्यापीठ–अनुदान–मंडळाने आर्थिक साहाय्य दिले. या संबंधात उस्मानिया विद्यापीठाचे कुलगुरु तसेच डॉ. जी. माधवरेड्डी, कोऑर्डिनेटिंग ऑफिसर, यु. जी. सी. युनिट यांनी दाखविलेल्या आस्थेबद्दल त्यांचा आभारी आहे.

मुखपृष्ठाची सजावट श्री. एम्. पुराणिक यांनी आकर्षकरीत्या केली. लक्ष्मी आर्ट प्रेसचे चालक श्री. जी. नारायणराव यांनी पुस्तकाचे मुद्रण सुबकरीतीने करून दिले, याबद्दल त्यांचे आभार.

३–४–१०१३/१९
राजेंद्र कॉलनी, बरकतपुरा
हैदराबाद–५०००२७.

**माणिक धनपलवार**

# Foreword

The closing years of the seventeenth century mark the opening of a new and eventful chapter in the history of Marathi literature. It is interesting to note that this chapter was written not in the Marathi-speaking area of the country, but in the heart of the present Tamilnadu, during the illustrious rule of the Maratha kings of Thanjavur. The author of the first Marathi play was one of the kings himself. The first Hindi play is also ascribed to the same king, Shahraja Bhosle, who succeeded his father Venkoji alias Ekoji Bhosle, half-brother of Shivaji, the great and the founder of Maratha rule at Thanjavur.

Maratha Rulers of Thanjavur were great patrons of learing and all that embodied Indian culture. They attracted scholars from all over the land and were always surrounded by a galaxy of poets, pandits, musicians and artists, irrespective of the language they spoke or adopted for the exposition of their scholarship. Shahraja, the second king of Thanjavur, who ruled from 1684-1710 A. D. was himself a great scholar of Sanskrit, Marathi and Hindi. Many Telugu works are also attributed to him. Telugu Yakshagan and Prabandha Kavya were at their height during the reign of Shaharaja Bhosle.

When scholars and creative writers of different languages come under one patronage, it is but natural that they share their thoughts, style and exposition with each other and enrich themselves and the literature they produce. It was under this fruitful and invigorating atmosphere, that some of the trends in South Indian languages, particularly Telugu literature, found their place in Marathi literature. Marathi literature also must have had its impact on the South Indian languages in some form or the other. Researchers in the respective languages can point out the exact nature of this impact.

As referred to earlier, Prabandha literature both in Sanskrit and Telugu flourished during the reign of Shahraja Bhosle. Poets of this age and of the subsequent one perfected this form which in a way was an artistic blend of Mahakavya pattern and the Champu style. Marathi poets at Thanjavur were naturally impressed by the new style and tried to introduce this trend in Marathi literature. 'Rajgopalvilas' by Shyamraj can be regarded as one of the first works much influenced by the Prabandha style, so popular during the age. 'Rajgopalvilas' is being published for the first time and my colleague Shri Manikrao Dhanpalwar deserves to be congratulated for bringing to light this important and epoch-making work.

A Marathi manuscript of this work was found at Maharaja Serfoji's Saraswati Mahal Library at Thanjavur. The entire work describes an interesting incident in Lord Krishna's life. Shri Dhanpalwar in his introduction in Marathi has taken pains to find out the original source of this story. He has established that Bhagwat and Harivansa Puran provide some material for the development of this story. However, the story is mostly based on the poet's imagination. It is possible that the enchanting love-story must have been based on some folk tale, then prevelent in the Thanjavur area, which appears to have been sublimated in this work written in the Mahakavya style. Vivid pictures presented by the poet bear a testimony of his poetic genious. Although, the main aim of the poet is to extol Rajgopal by which name the Lord Krishna of Mannargudi temple is popularly known, it is not impossible that he may be having in his mind his patron Shahraja, the king of Thanjavur. This was not uncommon during those days and even earlier with the court-poets. The famous Kannada poet Pamp in his 'Bharat' had in his mind his patron Arikesari while depicting Arjuna. Many more instances can be quoted.

One of the trends in old Marathi poetry is popularly known as Panditi Kavya - poetry composed by scholars, as against the poetry of saints - Santa Kavya. Although, the beginning of the

Panditi Kavya tradition can be traced back to Thirteenth century, this trend flourished mostly in 17th and 18th century. It is not mere accident that most of the renowned poets, Raghunath pandit, Anand - Tanaya to name a few, had their roots in south - Jinji and Thanjavur.

'Rajgopalvilas,' being published and presented by the editor in proper perspective unfolds the mystery of this South Indian contribution to Marathi poetry. Raghunath pandit and Anand-Tanaya were contemporaries and migrated from Thanjavur to Maharashtra with all their cultural and literary heritage. Shyamraj, the author of Rajgopalvilas, who was nurtured in the same atmosphere appears to be junior contemporary of these two poets known to Marathi literature. As his works remained unpublished so far, the impact of South Indian trends on Marathi literature could not be properly assessed. Now the work is being published, proper assessment of Panditi Kavya in the medieval period can be made. Apart from its literary value, this aspect of 'Rajgopalvilas' appeals me most.

Shri Dhanpalwar in his introduction to this work has presented the work with adequate background of Marathi literature and the South Indian trends, besides assessing the work as a piece of poetry. He has also added appendices useful for the study of this work.

This is the fourth publication of the Department of Marathi. I am grateful to the Vice-chancellor of the Osmania University, the University Grants Commission and Dr. Bh. Krishna Murthi Dean, Faculty of Arts, Osmania University, for their encouragement to Marathi research and learning.

Dept. of Marathi
Osmania University,
197 4.

**S. R. Kulkarni**
Professor & Head,
Dept. of Marathi.

# पुरस्कार

'राजगोपालविलास' काव्याच्या प्रा. माणिकराव धनपलवार यांनी काढलेल्या शोधपूर्ण आवृत्तीला पुरस्काराचे चार शब्द लिहिणे एका कारणास्तव विशेष आनंददायक आहे. त्यांचा आमचा थोडेच दिवस पण निकट सहवास घडल्यामुळे त्यांचा उमदा आनंदी स्वभाव आणि संशोधनाविषयीचा उत्साह यांचा चांगला परिचय झाला आणि त्यातून जो स्नेहसंबंध निर्माण झाला त्याचे धागे आजवर दृढतर बनत गेले आहेत. ज्ञानदेवी हस्तलिखितांच्या संशोधनाकरिता आम्ही तंजावर येथे गेलो असता हैदराबादचे डॉ. प्रमोद लाळे आणि श्री. माणिक धनपलवार हे प्राध्यापकद्वय संशोधनानिमित्त तेथे आले होते. तेव्हा माणिकरावांनी केलेल्या शोधामध्ये प्रस्तुतचे 'राजगोपालविलास' काव्य त्यांना गवसले. ते बहुतांशी अ-पूर्वप्रकाशित असल्यामुळे त्याची व्यवस्थित प्रत तयार करून त्याला शोधपूर्ण प्रस्तावना आणि टीपा जोडून ते आता प्रकाशित करीत आहेत. यात आणखी एक स्नेहानंदाचा धागा गुंतलेला आहे. तंजावरला असताना साप्ताहिक सुटीच्या दिवशी आम्ही तिघांनी मिळून जवळपास प्रवास केला. त्यात राजगोपालाचे प्रख्यात मंदिर ज्या मन्नारगुडीनामक क्षेत्रामध्ये आहे तिथे आम्ही गेलो होतो. माणिकरावांच्यासह हा जो प्रवास घडला आणि त्यात त्यांचा जो संशोधकीय उत्साह दिसून आला त्याचे वर्णन आम्ही केले असून ते प्रसिद्धही झाले आहे. मन्नारगुडी येथील राजगोपालमंदिर, तेथील समर्थ-परंपरेपैकी मेरुस्वामी यांचा मठ याचा शोध घेण्यात माणिकराव किती व्यग्र होते हे आमच्या आठवणीत चांगले ठसलेले आहे. अशा त्या आठवणीच्या दिवसांत उगम पावलेल्या तरुण प्राध्यापकाच्या संशोधनाचे हे फल पाहून मनाला फार संतोष व्हावा आणि त्यांचे मनःपूर्वक अभिनंदन करण्याची संधि मिळताच ती साधावी हे स्वाभाविक आहे.

तंजावरला मराठी राज्य झाल्यापासून तिकडे मराठी वाङमयाची जी निर्मिती झाली ते एकंदर मराठी वाङमयाचे फार मोठे आणि सर्व प्रकारांनी समृद्ध दालन आहे. त्याच्याकडे इकडच्या महाराष्ट्रातील विद्यापीठांचे आणि अभ्यासी

मंडळीचे जितके असावे तितके लक्ष नाही ही खेदाची गोष्ट होय. ह्या विषादामध्ये प्रा. माणिकरावांच्यासारख्या आंध्र प्रदेशातील मराठी संशोधकाने असले कांही संशोधन करून ते प्रकाशात आणले म्हणजे आनंदाची तिरीप उमटते, आणि मन सुखावते. पुणे–मुंबईच्या मानाने भागानगर तंजावरला जवळ आहे. मला वाटते तिकडील सरकार आणि विद्यापीठ अधिक उदार आणि संशोधनाला अनुकूल आहे. त्यामुळे माणिकरावांचा हा प्रयत्न फलद्रूप होऊन प्रकाशात येऊ शकला आहे.

येथे प्रकाशित होत असलेले 'राजगोपालविलास' हे काव्य आतापर्यंत जवळ जवळ अप्रकाशित होते. जवळ जवळ म्हणण्याचे कारण याचा दुसरा व पाचवा उल्लास निराळ्या हस्तलिखितांच्या आधारे तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयाच्या नियतकालिकात १९६६ साली प्रसिद्ध झाला आहे. तथापि ते नियतकालिकातले आंशिक प्रकाशन जमेला धरण्याजोगे नसल्यामुळे एकंदरीने संपूर्ण काव्याचे हेच पहिले प्रकाशन म्हणण्यास हरकत नाही. या अपूर्वतेचे श्रेय माणिकरावांना द्यावयास हवे. प्रकाशन जसे अपूर्व तसेच हे काव्यही अपूर्व आहे. यातील कथाभाग केवळ कविकल्पित आहे. महाभारत, हरिवंश, श्रीमद्भागवत यांच्यामधून आणि इतर अनेक पुराणांमधून श्रीकृष्णाचे चरित्र नाना परींनी गाइले गेले असता ते सगळे सोडून या श्यामराज कवीने कृष्णाची एक निराळीच प्रेमकथा कल्पून तिच्यावर नऊ उल्लासांचे एक मोठे काव्य रचावे ही अतिशय अद्‌भुत गोष्ट म्हणावी लागेल. ह्या वैशिष्ट्यामुळे हे काव्य प्रकाशात आणण्याचा प्रा. माणिकरावांचा उद्योग अधिकच स्तुत्य आणि महत्त्वाचा मानावा लागतो.

ही कवीची स्वकपोलकल्पित कथा असल्यामुळे भारत–भागवताच्या आधाराने रचलेल्या भक्तकवींच्या आख्यान–काव्याप्रमाणे यात भक्तीचा रंग आढळणार नाही. यात मुख्यत्वेकरून श्रीकृष्णाच्या प्रेमलीला आणि त्याही पुष्कळशा उत्तान स्वरूपात वर्णन केल्या आहेत. आपले ईश्वरी सामर्थ्य श्रीकृष्ण येथे अनंगविलासांचा विस्तार करण्यात खर्च करतो. तेव्हा या काव्यात बहुतेक सर्वत्र शृंगाराचा गडद रंग भरगच्च भरून गेलेला आहे असे आपल्या प्रत्ययास येते. पाचव्या व सहाव्या उल्लासात युद्धप्रसंग आहे. त्यात आणि आठव्या उल्लासात थोडासा वीररसाचा शिडकावा आहे पण तो बेतास बात. तंजावरच्या राजदरबारातील सुखासीन मंडळींना तोषविण्यासाठी या तंजावरी कवीने असे शृंगारप्रचुर धोरण ठेविले की काय न कळे ! रघुनाथ पंडिताच्या 'नलदमयंती–स्वयंवरा'त देखील शृंगाराधिक्य आहे; पण त्यात चातुर्य फार मोठे आहे.

प्रस्तुत काव्याची आवृत्ति प्रा. माणिकरावांनी साक्षेपीपणाने सर्व अंगोपांगांनी परिपूर्ण अशी काढली आहे. कोणाही वाचकाला काव्यास्वादनाच्या कामी तिचे मूल्यवान साह्य होईल. स्वकपोलकल्पित कथाभागावर लिहिलेल्या अडीचशे वर्षांपूर्वीच्या आजवर अप्रकाशित असलेल्या या काव्याचे पद्धतशीररीतीने संपादन करून चांगल्यारीतीने प्रकाशित केल्याबद्दल जुन्या मराठी वाङ्मयाबद्दल आस्था बाळगणारे सर्व मराठी वाचक आणि अभ्यासक प्रा. माणिकरावांना धन्यवाद देतील यात शंका नाही. त्यांचे संशोधनकार्य असेच पुढे चालो आणि चढत्या वाढत्या यशाने मंडित होवो असे इच्छितो.

६१/४५ डॉ. केतकर रस्ता पुणे
शके १८९६.

**श्री. ना. बनहट्टी**

# प्रस्तावना

'राजगोपालविलास' हे काव्य तंजावरकडील श्यामराज कवीने लिहिले असून संपूर्ण काव्य प्रथमच प्रकाशात येत आहे.[१] ह्या संपूर्ण काव्याची एकमेव हस्तलिखित प्रत[२] तंजावर येथील सरस्वती महाल ग्रंथालयात उपलब्ध झाली आहे.

'राजगोपाल' हे नाव मराठी वाचकाला नवीन आहे. तंजावर जिल्ह्यातील मन्नारगुडी येथील कृष्णास 'राजगोपाल' म्हणतात. त्याचा प्रामुख्याने विलास प्रस्तुत काव्यात वर्णिला आहे. यात आलेली कथा एका दृष्टीने अपूर्व असून ती कवीची स्वतंत्र निर्मिती आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. यामुळे मराठी आख्यान-काव्याच्या परंपरेत या काव्यकृतीस वैशिष्ट्यपूर्ण स्थान प्राप्त व्हावे.

**काव्यनाम**

प्रस्तुत काव्याचे नाव 'राजगोपालविलास' असून कवीने प्रत्येक उल्लासाच्या पुष्पिकेत "इति श्रीराजगोपालविलासे..." असे नमूद केले आहे. नवव्या उल्लासाच्या शेवटच्या श्लोकात "श्रीगोपालविलास" असे काव्यास संबोधले असले तरी वृत्तसौकर्यासाठी केलेले पूर्ण नावाचे ते संक्षिप्त रूप होय. शिवाय मन्नारगुडीच्या कृष्णाचे पूर्ण नाव 'राजगोपाल' असेच आहे. यामुळे 'राजगोपाल-विलास' हेच काव्याचे नाव होय, हे स्पष्ट आहे.

१. यापूर्वी एस्. गणपतिराव यांनी दुसरा व पाचवा उल्लास, हस्तलिखित क्र. ९५६ व ८२१ च्या आधारे प्रसिद्ध केला आहे. सरस्वती महाल ग्रंथालयाचे नियतकालिक, Vol. XIX, No. 3 & Vol. XIX, Nos. 1 & 2, 1966.

२. हस्तलिखित क्र. १५०२, मराठी ग्रंथांची बयाजवार यादी, भाग २, सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर.

## कविनाम

कवी स्वतःला श्यामकवींद्र (प्रत्येक उल्लासाच्या अंती), श्यामराज ९–६२, श्यामराजा (काव्यांती) असे संबोधतो. ह्या कवीने स्वतःविषयी जी माहिती काव्याच्या शेवटी दिली आहे, तीवरून ह्याच्या पित्याचे नाव खंडो त्र्यंबक असून गोविंदतातकन्या ही आई होय. आईचे नाव नमूद न करता तिच्या वडिलाचे म्हणजे स्वतःच्या मातामहाचे नाव कवीने दिले आहे. कवी गौतमगोत्रोत्पन्न असून दाक्षिणात्य पद्धतीप्रमाणे स्वतःचे आडनाव मात्र त्याने कुठेही दिले नाही.

## जन्मस्थल

ह्या कवीचा जन्म वाराहवापी येथे किंवा वाराहवापी असलेल्या गावी झाला, असा काव्यांतीच्या श्लोकाचा अर्थ होतो. वाराहवापी असलेले कवीला अभिप्रेत असलेले स्थान कोणते, याविषयी निश्चित विधान करणे कठिण आहे. श्री. एम्. गणपतिराव यांच्या मते[३] ही वाराहवापी तिरुनेलवेली येथील वाराहनेरी (वाराहन् + एरी = वापी) किंवा कुंभकोणम् येथील 'वराहकुळम्'ला अनुलक्षून असावे. दुसरा पर्याय त्यांना अधिक संभवनीय वाटतो. कारण तंजावरपासून कुंभकोणम् हे गाव फार जवळ (अडतीस कि. मी. अंतर) आहे. तसेच तिरुचिरापल्लीच्या (तंजावरपासून पन्नास कि. मी. अंतरावर) एका उपनगराचे नावही 'वाराहनेरी' आहे. पण येथे वापी मात्र आढळत नाही. आणि 'स्तवन करणे' हे गावापेक्षा वापीच्या बाबतीत अधिक समुचित ठरणारे आहे. कुंभकोणम् येथील वापी 'वराहकुळम्' या नावाने विख्यात असल्यामुळे ते त्याचे जन्मस्थान असावे असे वाटते. कुंभकोणम् हे क्षेत्र माधवस्वामीच्या त्रिवंदूर ह्या रामदासी मठ असलेल्या गावापासून अगदी जवळ आहे. तसेच तंजावर पादाक्रांत करण्याच्या अगोदर व्यंकोजीचे ह्या गावी बराच काळ वास्तव्य होते[४], हेही या संदर्भात लक्षात घ्यावे.

## कविकाल

कवीने काव्यात कुठेही लेखनकाल दिला नाही. तंजावरच्या सरस्वती

---

३. उ. नि. Vol. XIX, No. 3, 1966.

४. अ. का. प्रियोळकर (संपा.), दमयंती–स्वयंवर, प्रस्तावना, पृ. १३.

महाल ग्रंथालयात 'राजगोपालविलासा'चा केवळ पाचवा उल्लास असलेली एक प्रत उपलब्ध असून[५] तीत शेवटी–

**पिंगळनाम संवत्छरि वैशाख शुध दशमि शुक्रवारी**
**ग्रंथ समर्पीला मुरारी.**

असा उल्लेख आढळतो. पिल्ले यांच्या जंत्रीप्रमाणे संवत्सर, तिथी व वार जुळणारा शक १७१९ हा येतो. त्यानुसार इंग्रजी तारीख ५ मे, १७९७ अशी येते. पण काव्यलेखनाचा हा काळ मानता येणार नाही. कारण एक तर ज्या पाचव्या उल्लासाच्या शेवटी काळाचा उल्लेख आहे, तेथे काव्य पूर्ण होत नाही. कोणताही कवी आपला अपूर्ण ग्रंथ ईश्वरास अर्पण करणार नाही. यामुळे 'ग्रंथ समर्पीला' हे म्हणणे काव्यरचनाकालाचे निदर्शक नसून प्रतलेखनकालाचे निदर्शक होय, असे म्हणावे लागते. शिवाय हा कवी शके १७१९ पूर्वी होऊन गेला यास महत्त्वाची प्रमाणे उपलब्ध आहेत.

प्रस्तुत कवीने दक्षिणद्वारकेच्या स्तवनपर एक चूर्णिका लिहिली आहे.[६] तीत तंजावरला शहाजी राजे राज्य करीत असल्याचा उल्लेख आहे.

**श्रीशाहराजमार्तंडमुदितचोळमंडळ-पुंडरीकर्कणिका**
**रघुवीरवर कविराज श्यामराज वर्णी दक्षणद्वारका**
**राजगोपराजधानी विराजते.**

शहाजी हा तंजावरचा पहिला मराठी राजा व्यंकोजी याच्यानंतर गादीवर आला असून त्याचा शासनकाल इ. स. १६८४ ते १७१० असा सव्वीस वर्षांचा आहे. प्रस्तुत कवी ह्या काळात हयात होता हे वरील पुराव्याधारे स्पष्ट होते. तसेच श्यामराजाने लिहिलेले 'मेरुस्वामीस्तवन'[७] हेही कवीच्या कालनिश्चिती-करिता उपकारक ठरणारे आहे. यातून कवीने मेरुस्वामीस प्रत्यक्ष पाहिल्याचा पुरावा मिळतो. "शिव शिव बहु भाग्यें देखिला मेरुयोगी," असे श्यामराजाने

५. हस्तलिखित क्र. ८२१, उ. नि. भाग १.
६. ही चूर्णिका परिशिष्टात दिली आहे.
७. परिशिष्टात दिले आहे.

लिहिले असून "...प्रगट घडत आहे श्यामराजी प्रचीती," या चरणाने काव्याचा शेवट केला आहे. मेरुस्वामींच्या निधनानंतर कांही काळ लोटल्यावर त्यांचे ध्यान डोळयांपुढे आणून केलेले हे वर्णन वाटते.

मेरुस्वामी शके १६५५ मध्ये समाविस्थ झाले.[८] म्हणजे हा कवी शहाजीच्या शासनकाळाचे प्रथम वर्ष, शके १६०६ (इ. स. १६८४) ते मेरुस्वामींचे निधन शके १६५५ (इ. स. १७३३) या दरम्यान हयात होता असे उपरोक्त दोन पुराव्यांच्या आधारे सिद्ध होते. म्हणजे एकापरीने 'दमयती-स्वयंवर' कर्त्या रघुनाथ पंडिताचा तो जवळपास समकालीन, पण त्याच्यापेक्षा वयाने लहान होता असे म्हणता येईल.[९]

## गुरुपरंपरा

प्रस्तुत कवीने स्वतःच्या गुरूचे नाव मेघश्याम असे काव्याच्या शेवटी दिले आहे. कवी रामभक्त असून 'दक्षिणद्वारकापर चूर्णिके'त[१०] त्याने स्वतःचा 'रघुवीरवर' असा उल्लेख केला आहे. तसेच मन्नारगुडीचे माहात्म्य सांगताना 'श्रीराम नित्योत्सव माजवीतो' (१–९) असा श्रीरामाचा भक्तिभावपूर्ण निर्देश 'राजगोपालविलासा'त केला आहे. यावरून कवी रामदासीपरंपरेतील होय हे स्पष्ट आहे. श्यामराजाचे गुरु मेघश्याम हेही रामदासाच्या शिष्यपरंपरेतले असून त्यांची थोडीशी स्फुट काव्यरचना तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात उपलब्ध आहे. त्यावरून मन्नारगुडीत रामदासी मठाची स्थापना करणाऱ्या अनंतमौनीचे हे शिष्य होते असे दिसून येते. मेघश्यामाने स्वतःचे गुरु अनंतमौनीचे मोठ्या श्रद्धाभावपूर्ण शब्दांत वर्णन केले आहे.

८. वि. ल. भावे, पुरवणी लेखक, शं. गो. तुळपुळे, महाराष्ट्र सारस्वत, पृ. ८८८

९. i कै. राजवाडे यांच्या मते रघुनाथ पंडिताचा काळ, शके १५८२-१६४३. तत्रैव, पृ. ८९७.

ii श्री. ना. बनहट्टी यांच्या मते इ. स. १६५०–१७२०. बनहट्टी-संपादित दमयंती-स्वयंवर, पृ. २८.

१०. उ. नि.

आले आनंत सद्‌गुरु राव थोर
सन्मुख बैसउनि ठेविला माथा कर
...याचिपरी वो मेघश्याम जाणा
उमजउनि केलासे शाहाणा[११]

तसेच दुसऱ्या एका पदातून–

आनंतस्वामीचे ध्यान हो आठवले मज तों
...चौदेहाची कुरवंडी करुनि मेघश्याम सांडी[१२]

एक श्रेष्ठ रामभक्त व 'भीमोपदेश,' 'रामसोहळा' इत्यादी ग्रंथांचे कर्ते मेरुस्वामी हेही अनंतमौनीचेच शिष्य होत. यावरून मेघश्याम व मेरुस्वामी गुरुबंधू ठरतात.

रामदासाच्या तंजावर प्रांताकडील शिष्यपरंपरेत श्यामराज कवीचे स्थान पुढीलप्रमाणे दाखविता येईल.

## श्यामराजाची अन्य काव्यरचना

'राजगोपालविलास' ह्या काव्याव्यतिरिक्त प्रस्तुत कवीची 'दक्षिणद्वारका-परचूर्णिका', 'मेरुस्वामीस्तवन', 'ईश्वरभिल्लिणीसंवाद व कृष्णपर कांही पदे एवढी स्फुट रचना उपलब्ध आहे. यांपैकी पहिल्या तीन रचना परिशिष्टात समाविष्ट केल्या आहेत.

११. हस्तलिखित क्र २०८४, उ. नि. भाग ३.
१२. तत्रैव.

## श्यामराज नावाचे अन्य कवी

मराठीत 'रुक्मिणीहरण' हे काव्य लिहिणारा शिवकालीन शामराज किंवा सामराज[१३] व भागवताच्या दशमस्कंधावर शके १४४८ मध्ये टीका लिहिणारा शामराज[१४] हे दोन कवी आढळून येतात. पण जन्मस्थल, गोत्र, काळ ह्या दृष्टींनी विचार करता 'राजगोपालविलास' कर्ता श्यामराज कवी ह्या दोघांपेक्षा भिन्न होय, हे स्पष्ट आहे.

'राजगोपालविलास' ह्या काव्याच्या विविध पैलूंचा विचार करण्यापूर्वी तंजावरकडील मराठी आख्यानकवितेचे स्वरूप समजावून घेणे आवश्यक आहे. त्याशिवाय प्रस्तुत काव्याच्या प्रकृतीची स्पष्टशी कल्पना येऊ शकणार नाही.

तंजावरकडील मराठी आख्यान-कविता हा एक स्वतंत्र अभ्यासाचा विषय आहे. महाराष्ट्रातील मराठी आख्यान-काव्याप्रमाणे तिकडे निर्माण झालेली आख्यान - कविता विषय - आशयाच्या दृष्टींनी संपन्न आहे. रामायण, महाभारत, भागवतादी विविध पुराणे यांतून स्फूर्ती घेऊन कवींनी त्यांतील कथांना काव्यविषय केले. भक्ती व अध्यात्म यांनी सर्वत्र मराठी आख्यान - काव्याला खतपाणी पुरविले असले तरी लौकिक भूमिकेवरून लिहिलेल्या आख्यान-काव्याचीही एक छोटीशी परंपरा तिकडे निर्माण झाली होती, असे मानण्यास जागा आहे. ह्या लौकिक दृष्टीचा पहिला उन्मेष रघुनाथ पंडिताच्या 'दमयंती-स्वयंवरा'त पाहावयास मिळतो. 'होय शृंगारा करुणरसा थारा' असे स्पष्टपणे स्वतःच्या कृतीचे प्रयोजन सांगणारा हा पहिलाच कवी आढळून येतो. ह्या दृष्टीने त्याचे योग्य ते कर्तृत्व मान्य व्हावे. रघुनाथ पंडिताच्या पावलावर पाऊल टाकून अन्य कवींनीही 'नलदमयंती' हा आपल्या काव्याचा विषय केला आहे. महादेवात्मज ह्या कवीने 'नळदमयंतीविवाह' हे आख्यान रचले असून त्यातही अर्थात् शृंगारालाच प्राधान्य आहे. नळावर एकनिष्ठ प्रेम करणाऱ्या दमयंतीला देवांचे ऐश्वर्यही तिच्या ध्येयापासून विचलित करू शकले नाही. देवांची स्तुती करणाऱ्या नळापुढे देवांचा ती पुढील शब्दांत निषेध करते.

१३. म. सा. पृ. ९०६.

१४. वि. बा. प्रभुदेसाई, शामराजाची भागवतावरील टीका, विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक, १९६७.

**देवांची कीर्तिगाथा अभिनव वदतां**
**कासया व्यर्थ चोथा... ॥ ५८ ॥**

मानवी लौकिक भाव ह्यांनाच प्राधान्य देण्याचा रघुनाथ पंडिताप्रमाणे ह्याचाही हेतू स्पष्ट दिसतो. ह्या काव्यावर महाभारताशिवाय 'नैषध-चरित' व रघुनाथ पंडिताचे 'दमयंती-स्वयंवर'[१५] यांचाही थोडा फार प्रभाव पडल्याचे जाणवते.

ह्या व्यतिरिक्त कृष्णचरित्रावर आधारलेल्या कांही आख्यानांतून भक्ती नाममात्र आली असून श्रृंगार–वीराचेच प्राबल्य अनुभवास येते. प्रस्तुत संपादि-लेल्या काव्यात व 'कृष्णमंजरी'[१६] ह्या प्रतापसिंहाच्या (इ. स. १७३९–६३) काव्यातही ह्या दोन रसांनाच प्राधान्य मिळालेले आहे.

तंजावरी परंपरेच्या या शाखेत तामीळनाडूतील कांचीजवळील पक्षीतीर्थ येथे जन्मलेल्या निरंजन माधवकृत 'सुभद्रा-स्वयंवरा'चाही (रचनाकाल, शके १६९०) समावेश करावा लागेल. स्वतःच्या काव्यास आधारभूत असलेल्या संस्कृत कृतींचा उल्लेख करताना पुराणादी ग्रंथांबरोबर पंचमहाकाव्यादी अन्य कृतींना (कवीभारती) अनुसरल्याचे कवी सांगतो.[१७] तसेच–

**शृंगारमुख्य नवही रस मूर्तिमंत**
**काव्यांत या परिसतां दिसती प्रशस्त ॥ १-९ ॥**

१५. तुलना : १. नळदमयंतीविवाह : झाला अदृश्य लोकां, ठकुनि सकळिकां लंघुनि सात बंका. श्लो. ४६
दमयंती-स्वयंवर : सात बंका पलीकडे अहो ते. श्लो. १०७.
२. नळदमयंतीविवाह : माउली निकट धाउनि आली, श्लो. ३६.
दमयंती-स्वयंवर : गजबज बहु जाली माय धांवोनि आली, श्लो. १४९

१६. गो. नागराजराव (संपा.) प्रतापसिंहकृत कृष्णमंजरी.

१७. कांहीं भागवती कथाक्रम असे कांहीं असे भारती
कांहीं अन्यपुराणभाव वरिला कांहीं कवीभारती ॥ १-१० ॥
–रा. चिं. ढेरे (संपा.). निरंजन माधवकृत सुभद्रा–स्वयंवर.

असे लिहून श्रृंगाररसाला प्राधान्य देण्याची आपली भूमिका कवीने स्पष्टपणे मांडली आहे.

हा दक्षिणेकडे जन्मलेला कवी पुढे महाराष्ट्रात आला असला तरी त्याच्या आयुष्याचा बराच मोठा भाग दक्षिणेकडेच व्यतीत झालेला आहे. तंजावर येथे पेशव्यांचा वकील म्हणून त्यांनी कांही वर्षे काम पाहिले. यामुळे या पंडित कवीचा तिकडील मराठी साहित्यसृष्टीशी व त्याला प्रेरणाभूत असणाऱ्या संस्कृत व अन्य कृतींशी संबंध येणे अपरिहार्य होते. यामुळे 'सुभद्रा-स्वयंवरा'चा तोंडवळा तंजावरकडील मराठी आख्यान-काव्याशी पुरता मिळता जुळता आहे. कथेचा विशिष्ट घाट, नाटचात्मकता, संस्कृत संकेतकल्पनांची विशेष आवड, तंजावरकडील अन्य मराठी ग्रथांशी असलेले वर्णनसाम्य,[१८] तंजावरी मराठीत विशेषेकरून आढळून येणारी शब्दरूपे व शब्दलकबा[१९] यांचा उपयोग, यादृष्टीनी असणारे साम्य लक्षणीय आहे. सामराजाच्या 'रुक्मिणीहरणा' वरही रघुनाथ पंडिताच्या 'दमयंती-स्वयंवरा'चा प्रभाव पडला होता, असे कै. श्री. अ. का. प्रियोळकर यांनी दाखवून दिलेल्या दोन्हीतील साम्यस्थळांवरून वाटते. यादृष्टीने मराठी आख्यान-काव्याच्या इतिहासात तंजावरी आख्यान-काव्याचा एक विशिष्ट संप्रदाय ( School ) मानावा एवढी त्याची योग्यता निश्चित आहे.

तंजावरी आख्यान-काव्याला ही जी पृथगात्मता आली, तिची अनेक कारणे असून तेलुगु प्रबंध-काव्याचा प्रभाव हे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणून दाखविता येईल.

१८. तुलना : १. सुभद्रास्वयंवर-सर्ग २, श्लो. ३६.
राजगोपालविलास-उल्लास-१, श्लो. ११.
२. सुभद्रास्वयंवर-तैं बोलिला उद्धव रम्यवाणी ।
वीरार्जुना योग्यचि कीरवाणी, ७-३८.
राजगोपालविलास-म्हणे गोप पक्षीश्वरा रम्यवाणी ३-६६.
ऐसी सार्था ऐकतां कीरवाणी, ४-४१.

१९. तां, तांही ५-३५, ७-४१, ४९. शिराणी, ३-१३. नवलाव, ४-२३. असल, ५-३७. झगटती, ६-१५.

## तेलुगु प्रबंध-काव्ये

तंजावरकडील मराठी साहित्यावर तेलुगु साहित्याचा फार मोठा प्रभाव पडला होता. मराठीतील 'यक्षगाना'ची निर्मिती ही तेलुगूने मराठीला दिलेली फार मोठी देणगी होय. तेलुगु काव्याचा मराठी आख्यान-काव्याच्या घडणीतही बराच हातभार लागला, असे मानण्यास जागा आहे.

रघुनाथ पंडिताने पंचमहाकाव्याचा आदर्श पुढे ठेऊन भक्ति-अध्यात्मापेक्षा एक वेगळे प्रयोजन काव्याला प्राप्त करून दिले, आणि एक वेगळा मार्ग दाखविला. महाराष्ट्रात याच काळात भक्तिपर काव्ये निर्माण होत होती. रघुनाथ पंडिताला हा निराळा मार्ग चोखाळण्याची जी प्रेरणा मिळाली ती तेलुगु कवीकडूनच होय, असे म्हणण्यास हरकत नाही. तेलुगूतील श्रीनाथ (पंधराव्या शतकाचा पूर्वार्ध) ह्या कवीने 'शृंगार-नैषधम्' हा 'नैषधीयचरिता'चा तेलुगु अनुवाद करून कृष्णदेवरायाच्या काळी झालेल्या शृंगारपर प्रबंध-काव्याचा पाया घातला. रघुनाथ पंडिताने आपल्या काव्यासाठी 'नैषध-चरिता'ला आधारभूत मानले तरी त्याच्यापुढे श्रीनाथाचा (किंवा त्याने प्रभावित[२०] झालेल्या रघुनाथ नायककृत 'नळचरित्रा'चा) आदर्श असावा. कारण यानेही श्रीनाथाप्रमाणे शृंगाराला महत्त्व देऊन दमयंतीच्या स्वयंवरापर्यंतच कथा रंगविली आहे. श्रीनाथाच्या शृंगाराला प्राधान्य देण्याच्या भूमिकेमुळे त्याने आपल्या काव्यास 'शृंगार–नैषधम्' असे श्रीहर्षापेक्षा वेगळे व अन्वर्थक नाव दिले.[२१] श्रीनाथाच्या प्रभावाचे[२२] हे मत ग्राह्य मानल्यास रघुनाथ पंडितास संपूर्ण नैषधचरित (किंवा

२०. G. V. Sitapati, History of Telugu Literature, P. 41.

२१. "Srinath with his fondness for love emphasised it and translated only that part of the poem."
तत्रैव, पृ. २७.

२२. मूळ नैषध-काव्यात विरहाने दमयंती मूर्च्छित पडते, तेव्हा सख्यांचा कलकलाट ऐकून भीमकराजा तेथे येऊन विचारपूस करतो. श्रीनाथाने यात बदल करून दमयंतीची आईही वडिलांसह तेथे आलेली दाखविली आहे. "सखिजनंबुला कलकलं बालिचि इदि एमी कोलाहलं, बनि, भीमभूपालुंडु देवीसहितुंडै यडुगा..." शृंगारनैषधम्, २–१४२. रघुनाथ पंडिताने बापाचा उल्लेख टाळून 'माय धांवोनि आली,' असे दाखवून श्रीनाथावरही कडी केली आहे.

नळकथा) मराठीत आणावयाचे होते, ही कांही मराठी समीक्षकांची समजूत नाहीशी होण्यास मदत होईल.

श्रीनाथाच्या कालखंडानंतर तेलुगूत 'प्रबंध-काव्या'च्या युगाला प्रारंभ झाला. प्रबंध हा काव्यरचनेचा विशिष्ट प्रकार आहे. तेलुगूत 'प्रबंध' याचा कोणतीही काव्यरचना एवढा व्यापक अर्थ होत नाही. साधारणत: महाकाव्याच्या अष्टादशवर्णनांचे लक्षण (पूर्णपणे किंवा प्राधान्याने) पाळणाऱ्या पंडिती कृतीला 'प्रबंध' म्हणण्याचा परिपाठ आहे. सोळावे शतक हा प्रबंध-काव्याचा उत्कर्षकाल असून कृष्णदेवरायाच्या ( इ. स. १५०३-१५३० ) दरबारातील अष्टदिग्गज म्हणविल्या जाणाऱ्या पंडिती कवींनी निर्माण केलेल्या विद्वत्ताप्रचुर काव्यकृतींनी प्रबंध-काव्याची प्रकृती व स्वरूप प्राधान्याने निश्चित केले. अल्लसानी पेद्दन्ना (कृष्णदेवरायाच्या दरबारातील) ह्याचे सहा आश्वासांनी युक्त 'मनुचरित्र' हे तेलुगूतील पहिले प्रबंध-काव्य मानण्यात येते.

प्रबंध-काव्यातील कथावस्तू इतिहास-पुराणातील असली व त्यात अष्टादश वर्णनांना स्थान असले तरी महाकाव्यापेक्षा याचे स्वरूप अनेक बाबतीत भिन्न असते. ह्या काव्यप्रकारात किती आश्वास असावेत याला नियम नाही. बहुतेक प्रबंध-काव्ये तीन ते सहा आश्वासांची असतात. एक आश्वासी प्रबध-काव्यसुद्धा असू शकते. प्रबंध–काव्यात गद्यासही आवर्जून स्थान दिलेले असते; पण गद्याचे प्रमाण अत्यंत अल्प असते. (यामुळे एखादा समीक्षक यास 'चंपूकाव्य' म्हणूनही संबोधतो.) गद्यभाग नसलेल्या प्रबंध-काव्यास 'निर्वचन प्रबंध' असे विशेष रीतीने संबोधले जाते. एकाच आश्वासात विविध वृत्तांची योजना असते. संवादांना भरपूर वाव असतो, व्यक्तिचित्रणापेक्षा कथावस्तूला अधिक महत्त्व दिलेले असते. याप्रमाणे महाकाव्याच्या रूपसिद्धीशी कांही बाबतीत साम्य ठेवणारा पण अनेक बाबतीत स्वातंत्र्य घेणारा असा हा लवचिक काव्यप्रकार आहे. ह्यातील प्रदीर्घ समासयुक्त रचना, अलंकारिकतेचा सोस, पांडित्यप्रदर्शनाची आवड, गद्याचा अंतर्भाव इत्यादी वैशिष्ट्ये तंजावर संप्रदायातील रघुनाथ पंडिताच्या 'दमयंती-स्वयंवरा'पासून निरंजन माधवाच्या 'सुभद्रा-स्वयंवरा'पर्यंत झालेल्या अनेक काव्यात आढळून येतात. रघुनाथ पंडिताचे 'दमयंती-स्वयंवर' हे महाकाव्य आहे काय, असे जे मधूनच वाटते, त्याचे मूळ महाकाव्याची कांही लक्षणे पाळणाऱ्या तेलुगु प्रबंध-काव्याच्या अनुसरणात असावे. त्यात आलेली एकच चूर्णिका प्रबंध काव्यात येणाऱ्या गद्याशी नाते जोडणारी आहे. (कांही तेलुगु प्रबंध–काव्यातून चूर्णिकाही आढळून येतात.)

तसेच तंजावर संप्रदायातील बऱ्याच कवींनी आपल्या काव्यास 'प्रबंध' म्हणूनच संबोधले आहे. 'दमयंती-स्वयंवरा'च्या[२३] संदर्भात एका प्रतकाराने आणि 'राजगोपालविलास'[२४] व 'कृष्णमंजरी'[२५] ह्या काव्यात स्वत: कवींनी आपल्या कृतींस 'प्रबंध' असेच म्हटले आहे. हे सर्व कवी तेलुगु साहित्याच्या संपर्कात आलेले असल्यामुळे 'प्रबंध' याचा तेलुगु अर्थच त्यांना अभिप्रेत असावा, असे वाटते.

तसेच कांही तेलुगु कवींनी इतिहास- पुराणांचा आधार घेण्याचा दंडक झुगारून प्रबंध काव्याची स्वतंत्रपणे निर्मिती केली. पिंगली सुरना ह्याचे कलापूर्णो-दयम् (रचना, इ. स. १५५०) व मादयगारी मल्लन्ना (कृष्णदेवरायाच्या दरबा-रातील) याचे 'राजशेखरचरित्र' ही काव्ये या दृष्टीने महत्त्वाची आहेत. प्रस्तुत 'राजगोपालविलास' यातील कथाही अशीच कविकल्पित आहे. प्रताप-सिंहाच्या 'कृष्णमंजरी'चाही याच संदर्भात उल्लेख करता येईल. 'राजगोपाल-विलास' यात 'राजशेखरचरित्रा'प्रमाणे शुकदूताची योजना केलेली आहे. त्यात त्रिकालज्ञ शुकाच्या मध्यस्थीने राजशेखर व असुरकन्या कांतिमती यांचा विवाह होतो, असे दाखविले आहे.

तेलुगु प्रबंध-काव्याचा एक महत्त्वाचा परिणाम मराठी काव्याला मिळालेल्या नाटयात्मक घाटात आहे. नाटयात्मकता हा तेलुगु प्रबंध-काव्याचा महत्त्वाचा विशेष आहे. प्रबंध-काव्याचे स्वरूप विशद करताना– "संस्कृत काव्य व नाटय यांचा मोठा सुखद मेळ प्रबंध-काव्यात असतो," असे दिवाकर्ला वेंकटावधानी आपल्या 'तेलुगु साहित्याच्या इतिहासा'त[२६] लिहितात. प्रबंध–काव्यातील नाटयात्मक गुणांचा प्रकर्ष 'कलापूर्णोदयम्'सारख्या काव्यातून अनुभवास येतो. प्रबंध–काव्याच्या ह्या नाटयगुणांमुळेच नाटकाच्या समीक्षेच्या

२३. नलदमयंतीचा स्वयंवराचा विलासरस भारी ।
रघुनाथानें रचिला प्रबंधरूपें अशेष सुखकारी ।।
– हस्तलिखित क्र. २२०६, सरस्वती महाल ग्रंथालय.

२४. मत्प्रबंधविलसत्बहुलोहा, १–५. वक्ता तोच तसे प्रबंध घडले त्या श्यामराजाननें, ७–४८.

२५. तैसेच सर्व कविवर्य वर प्रबंधीं, २–१९.

२६. डॉ. दिवाकर्ला वेंकटावधानी, तेलुगु साहित्याचा इतिहास, पृ. २९.

संदर्भातील 'पंचसंधी'चा निकष कांही तेलुगु टीकाकार प्रबंध-काव्यासही लावतात.[१७]

तंजावरकडील कांही कृती तर नाटय व काव्य या दोन्ही साहित्यप्रकारांवर हक्क सांगणाऱ्या आहेत. शहाजी राजाच्या नावावर असलेले 'त्यागराजविनोद चरित्र' ह्या संस्कृत, मराठी व तेलुगु भाषांनी युक्त अशा कृतीला प्रबंध-काव्याची व नाटकाची अशी दोन्ही अंगे लाभली आहेत.[१८]

तेलुगु प्रबंध-काव्याला नाटकाचे गुणधर्म प्राप्त होण्याचे कारण संस्कृत नाटकांच्या तेलुगूत झालेल्या रूपांतर-प्रक्रियेला असावे. संस्कृत नाटकांचे रूपांतर काव्यरूपाने करण्याची पद्धती तेलुगूत बराच काळ मान्यता पावली होती.[२९] अर्थात् यासंबंधीची कारणमीमांसा कांहीही असो, 'राजगोपालविलासा'ला मिळालेला नाट्यात्मक घाट हा तेलुगु प्रबंध-काव्याच्या साक्षात् प्रभावामुळे होय, एवढे मात्र निश्चितपणे म्हणता येईल.

मराठीने तेलुगु काव्यातील कांही शैलीविषयक लकबांचे अनुसरण केले आहे. विशेषत: अनुनासिकांच्या पुनरुक्तीने नादमयता साधण्याची पद्धती तेलुगु कवींना विशेष प्रिय आहे. कांही शब्दसंहतीच्या बाबतीतही दोन्ही काव्यातून साम्य आढळून येते

---

२७. "Now coming to Five Sandhis... the Kalapurnodayam contains all of them."

G. V. Krishna Rao, Studies in Kalapurnodayam, P. 236.

२८. "His (Shahaji's) 'Tyagaraj Vinoda charitra' belongs to a peculiar type of literature; it is partly a prabandha and partly a drama".

G. V. Sitapati, History of Telugu Literature, P. 43.

२९. डॉ. बी. रामराजू (संपा.) चिन्न तिम्मय्या मंत्रीकृत 'प्रसन्नराघवनाटय-प्रबंधमु,' प्रस्तावना, के. लक्ष्मीरंजनम्, पृ. १.

**पांडुरंग माहात्म्य** :– "रंग त्तुंग तरंग हस्तमुल ना रत्ताकरेंद्रंडु नी"...
आश्वास १, श्लो० १३९.

**रा गो. वि.** :– "स्वंगत्तुंगतुरंगराजतिलके(क)श्रीराजगोपप्रभू", १–२५.

**राजशेखरचरित्र** :– "श्रीरमणीरमणीयविहारायतनुत्न"....२–१.

**रा. गो. वि.** :– "मग म्हणे रमणी रमणीय हा," २–२६.

अशा प्रकारची बरीच साम्यस्थळे काढून दाखविता येतील.

तसेच तेलुगु कवींचा चरणाच्या द्वितीयाक्षरावर प्रास साधण्याचा कटाक्ष असतो. 'दमयंती–स्वयंवर,' 'राजगोपालविलास', 'रुक्मांगद–चरित्र' आदी काव्यातून याची कितीतरी उदाहरणे आढळतात.[३०]

याच संदर्भात मराठी काव्यात आलेल्या तेलुगु शब्दांचा विचार अस्थानी ठरू नये. मराठी आख्यान-काव्यात कांही तेलुगु शब्द जसेच्या तसे किंवा थोडे बदलून आले तर कांही तत्सम शब्दांचा वापर तेलुगु अर्थाने करण्यात आला.

'दमयंती–स्वयंवरा'त आलेला 'वेंत्रे' किंवा इतरत्र आलेला 'वेचे' हा शब्द वोंगुटा (वाकणे) ह्या तेलुगु शब्दावरून सिद्ध झालेला दिसतो. 'आलोचना' ह्या तत्सम शब्दाचा 'विचार करणे' हा तेलुगु अर्थ असून 'जिची आलोचना करितां नीरच ये लोचना (द. स्व. श्लो० १८३) यात त्याच अर्थाने तो शब्द आलेला आहे. अ. का. प्रियोळकर याचा 'चर्चा करणे' असाही जो अर्थ देतात, तो बरोबर नव्हे. तसेच 'कल्याण' (लग्न)[३१] हाही वैशिष्ट्यपूर्ण शब्द नेहमी येतो. याशिवाय भुक्तायास (९–१४), जाजी (३–३९), अनुमान (शंका) (२–१७), ह्या शब्दांचा 'राजगोपालविलासा'तील उपयोग तेलुगु भाषेचा परिणाम सूचवितात.

याप्रमाणे तेलुगु प्रबंध - काव्याने मराठी आख्यान - काव्याच्या रूपसिद्धीला फार मोठा हातभार लावला. मराठी काव्याला आशयसंपन्न करण्याचे तेवढेच महत्त्वाचे कार्य तिकडील पुराणांनी केले.

३०. द स्व. श्लो० २३, २८, ४९, ७३ इत्यादी. रा. गो. वि. श्लो० ८–५१, ८–७०, ९–४, ९–२६ इत्यादी. रु. च. श्लो० ४७, १२३, १२४.

३१. महादेवसुत, नळदमयंतीविवाह, श्लो० ८२.

दक्षिणेकडे निर्माण झालेल्या अनेक देवदेवतांविषयक पुराणांचा तिकडील मराठी लोकजीवनावर फार मोठा प्रभाव पडला होता. त्या पुराणांनी मराठी काव्यालाही मोठ्या प्रमाणात खाद्य पुरविले आहे. निरनिराळ्या क्षेत्रांचे माहात्म्य सांगणाऱ्या मराठी आख्यानांच्या विपुल निर्मितीवरून[३२] त्यांच्या परिणामाची कल्पना येते. दक्षिणेकडील शैवपंथीय भक्तांची चरित्रेही मराठी कवींनी गायिली आहेत. प्रसिद्ध चौसष्ट शिवभक्त नायनारांपैकी तिरुनीलकंठ नायनार व कन्नप्पा नायनार यांच्या कथा अनुक्रमे 'नीलकंठकुलालवरचरित्र'[३३] व 'नीलभिल्लचरित्र'[३४] ह्या आख्यानांतून महाराजा सरफोजी दुसरे यांनी गायिलेल्या आहेत. दक्षिणेकडील शैव व वैष्णव पंथाने प्रभावित झालेल्या धार्मिक व सांस्कृतिक प्रवाहाशी मराठी माणूस एकरूप झाला होता. प्रसिद्ध शिवक्षेत्र तिरुवारूर येथील त्यागराजास तंजावरच्या मराठी राजांनी आपले कुलदैवत केले. स्वतः सरफोजी भोसले दुसरे यांनी दक्षिणेकडील विविध क्षेत्रांचे दर्शन घेऊन मंदिरास मौल्यवान देणग्या दिल्या. 'शरभेंद्र-तीर्थावळी'[३५] ह्या ग्रंथात याचे सविस्तर वर्णन आले आहे.

तसेच 'चंपकारण्यक्षेत्रमाहात्म्य'[३६] म्हणजेच मन्नारगुडी ह्या क्षेत्राचे माहात्म्य कथन करणारा 'मार्कंडेय पुराणा'चा भाग ही दक्षिणेकडीलच निर्मिती असून त्याचा तेलुगु साहित्यावरही परिणाम झाला आहे. चेंगलवा कालकवी याचे 'राजगोपालविलासमु'[३७] नावाचे तेलुगु प्रबंध-काव्य व याच शीर्षकाची विजयराघव नायक याची तेलुगु यक्षगान कृती[३८] याची साक्ष देईल. प्रस्तुत 'राजगोपालविलासा'वरही याचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष परिणाम दिसून येतो. गोभिल, गोप्रलय, चंपकवन, हरिद्रा नदी यांचे उल्लेख हेच दर्शवितात यातील नायक 'राजगोपाल' हाच मुळी ह्या पुराणाचे संस्कार घेऊन जन्मास आला आहे

३२. सरस्वती महाल ग्रंथालय, मराठी ग्रंथांची बयाजवार यादी, भाग १ व भाग ४.

३३-३४. सरस्वती महाल ग्रंथालयाचे नियतकालिक, Vol. XXIV, No. 3, 1971.

३५. ए. कृष्णस्वामी महाडीक रावसाहेब (संपा.), शरभेंद्र तीर्थावळी.

३६. या पुराणातील तपशील परिशिष्टात आला आहे.

३७. एन्. वेंकटराव (संपा.) राजगोपालविलासमु.

३८. तत्रैव, प्रस्तावना, पृ. १३.

दक्षिणेकडील देवदेवतांची भक्ती व तद्विषयक पुराणे यांच्या प्रभावामुळे तंजावरकडील मराठी आख्यान-काव्याची पार्श्वभूमीच अनेक वेळेला बदलून गेली आहे व काव्यातील वातावरणही त्याचमुळे भिन्न झाले आहे.

दक्षिणेकडे विशेष मान्यता पावलेल्या संगीत व नृत्य या कलाप्रकारांचा मराठी आख्यान-काव्यावरही प्रभाव पडलेला आहे. वारवनिता किंवा देवदासी यांच्या नृत्याची वर्णने कांही काव्यकृतींतून आली आहेत. पण गानकलेचा महत्त्वाचा परिणाम आख्यान-काव्यातून आलेल्या गेय अशा रागदारीतील पदातून व्यक्त होतो. संगीत व काव्य हे एकत्र नांदणे एकंदरीने कठिणच. यामुळे अशा पदांनी युक्त असलेल्या कृती काव्य या दृष्टीने फारशा सरस उतरल्या नाहीत. याशिवाय फारशी रागदारीत नसलेली पण चालीवर गाता येण्यासारखी पदरचना कीर्तनाकरिता लिहिलेल्या आख्यानांतून आढळून येते. आनंदतनयाने अशी पदरचना केली असून त्यानेच मराठीत पहिल्यांदा हा उपक्रम केला, असा कै. अ. का. प्रियोळकर यांचा तर्क आहे.[३९]

मराठी आख्यान–काव्याच्या आशयावर आणखी एका घटकाचा परिणाम झाला आहे, आणि तो म्हणजे तामीळ भाषेतील कोरवंझी नाटक होय.

## तामीळ कोरवंझीचा प्रभाव

कोरवंझी हा खास तामीळी यक्षगान-नाटकाचा प्रकार आहे. या धर्तीवर अनेक तेलुगु व मराठी नाटके[४०] निर्माण झाली. या प्रकारच्या नृत्यनाटचात वन्य जातीतील कुरव स्त्री नायिकेचा हात पाहून इष्टवराच्या प्राप्तीसंबंधी भविष्यकथन करते. मराठी कोरवंझी नाटकांत कुरव ह्या जमातीशी संलग्न अशा कैकाडिण किंवा बुरूड ह्या पात्राची योजना असते. ह्या नाटचप्रकाराचा मराठीतील आख्यान - काव्यावर प्रभाव पडलेला आहे. प्रतापसिंहाच्या नावावर असलेल्या 'कृष्णमंजरी' या आख्यान - काव्यात कैकाडिण हे पात्र आले आहे. कृष्णाचा एका असुर-कन्येशी होणारा विवाह ही ह्या काव्यातील कथा आहे.

३९. उ. नि. पृ. ९७.

४०. प्रतापसिंहाचे 'लक्ष्मणादेवीकल्याण,' हस्तलिखित क्र. १७३६ व श्री कोरवंझी (जानकीसुखोल्लास) क्र. १७४५, सरस्वती महाल ग्रंथालय.

यात विरहाकुल असुरकन्येला कृष्णप्राप्तीसंबंधीचे भविष्यनिवेदन कैकाडिण हे पात्र करते. तिने अनेक देश पालथे घातले असून अनेक राजांना पाहिलेले असते.

**कें कें देश फिरुनिया गुणवती विख्यात लोकत्रयीं**
**आली ते शकुनज्ञ दैवगतिने कैकाडिनी येथही ।। ४.६१ ।।**

ती कैकाडिण –

**'श्रीतारुण्यविलासलंपटहिरा शीतांशुवंशाग्रणी'** असलेल्या कृष्णाची निश्चितपणे प्राप्ती होईल असे भविष्य असुरकन्येस सांगते, व त्या भविष्य-श्रवणामुळे तिला अपार आनंद होतो, असे दाखविले आहे.

'राजगोपालविलास' ह्या काव्याचा अभ्यास करताना उपरोक्त पार्श्वभूमी लक्षात घेणे आवश्यक आहे. कारण त्यातच या काव्याच्या अपूर्वतेची कारणे सामावलेली आहेत.

## राजगोपालविलास : एक अपूर्व कथावस्तू

मराठीत कृष्णचरित्रपर वा अन्य आख्याने विपुल व समृद्ध असली तरी त्यात स्वतंत्र कथावस्तूचा अभाव आहे. रुक्मिणी-स्वयंवर, सुभद्राहरण, सीता–स्वयंवर इत्यादी आख्यानांतील विविध अंगे पुराणांद्वारे व महाकाव्यांद्वारे आपणांस अगोदरच ज्ञात झालेली असतात. कवीचे कौशल्य काव्याच्या रचनेत व प्रसंग-चित्रणात अनुभवास येते. क्वचित् एखादा दुसरा प्रसंग कल्पून त्यात समाविष्ट करण्यात येतो. त्या दृष्टीने त्या त्या कवीचे कर्तृत्व मान्यच करावे लागते; पण कथा फुलविण्याला मर्यादा पडतात. कारण त्याचा ठराविक शेवट अटळ असतो. परंतु प्रस्तुत काव्यातील कथावस्तू मुळातच नवीन आहे. यात कृष्णचरित्रात कुठेही न आलेली कथा कवीने कल्पिली आहे. पुराणादी अन्य कृतींचा केवळ साधनरूप वापर करून नवनिर्मितीचे कौशल्य दाखविणारी आख्याने मराठीत जवळपास नाहीतच. त्या दृष्टीने ह्या काव्यातील कथावस्तूचे महत्त्व जाणवल्या-वाचून राहत नाही.

## कथावस्तूचे स्वरूप

ह्या काव्यातील नायक कृष्ण (राजगोपाल) मृगयेसाठी निघाला असता गवाक्षातून पाहणारी मनोरमा नावाची लावण्यवती त्याच्या दृष्टीस पडते. कृष्ण

तिच्या सौंदर्यावर लुब्ध होतो. मृगयेस न जाता व्यथित अंतःकरणाने तो घरी परत येतो. कृष्णाची ही विरहमनस्क, उदासीन अवस्था पाहून त्याने पाळलेला शुक दूतकर्म पत्करून मनोरमेकडे जातो. तीही कृष्णभेटीसाठी आतुर झालेली असते. कृष्णाने पाठविलेल्या गरुडावर आरूढ होऊन ती कृष्णाकडे येते, व भेटीनंतर स्वगृही परत जाते.

कृष्णाच्या ह्या प्रेमरहस्याची चाहूल त्याच्या सख्यांना लागते, व त्या रुष्ट होतात. त्यांची समजूत काढण्यासाठी शुक एक नामी युक्ती कृष्णास सुचवितो. त्यानुसार कृष्ण असुराशी झालेल्या युद्धात क्षतविक्षत झाल्याचे नाटक करून समुद्र-प्रासादात विश्रांती घेतो. इकडे शुक कृष्णस्त्रियांकडे जाऊन 'अनंगासुरा'शी झालेल्या युद्धात कृष्ण घायाळ झाल्याचे सांगतो. त्याच्या चतुरोक्तीतून राक्षसयुद्ध व मदनयुद्ध हे दोन्ही अर्थ सूचित होतात. कृष्णस्त्रियांना (भोळ्या बिचाऱ्या!) अर्थात् प्रकटार्थच उमजतो. व त्या ह्या वार्तेने दु:खी-कष्टी होऊन कृष्णास भेटण्यासाठी निघतात.

कृष्णस्त्रियांच्या प्रासादात उपस्थित असलेल्या बलरामाच्या गुप्तचराची त्यांच्याप्रमाणेच समजूत होऊन तो बलरामाकडे जातो, व कृष्ण-असुरयुद्धाची बातमी सांगतो. बलराम क्रोधाविष्ट होऊन असुरसमाचाराकरिता निघतो. असुरांचे स्थान समुद्रात असल्यामुळे (प्रजापतीच्या शापामुळे) व तेथेच त्यांनी कृष्णास लपवून ठेवले असावे या शंकेमुळे बलराम बाणाघातांनी समुद्र शुष्क करून टाकतो. त्याला आत एक सुंदर नगरी दिसते. त्या नगरीचा राजा विचित्रसेन आपला धाकटा बंधू चित्रसेन ह्यास बलरामाशी लढण्यास पाठवितो. त्या संग्रामात चित्रसेनाचा वध होतो. मग विचित्रसेन सैन्याचा अधिपती होऊन लढत असतो.

इकडे कृष्णस्त्रिया कृष्णाच्या प्रकृतीची विचारपूस करण्यास जातात. कृष्ण चतुरोक्तीने त्यांची समजूत घालतो. स्त्रिया त्याच्यावर विश्वासून संतुष्ट होतात व कृष्णासह जलक्रीडा करतात.

कृष्णाचा हा विलास चालला असता विचित्रसेन-बलरामयुद्ध द्वारकेवर येऊन ठेपते. प्रजा चिंताग्रस्त होते. शुक प्रजारक्षणार्थ कृष्णास विनंती करतो. त्यानुसार कृष्ण शस्त्र घेऊन युद्धास निघतो. कृष्णाच्या सामर्थ्यापुढे विचित्रसेनाचा टिकाव लागत नाही. कृष्ण त्यास ठार मारतो, व युद्धाचा एकदाचा शेवट होतो. कृष्ण,

बलराम, प्रद्युम्न व इतर यादवसैन्य विजयाची चिन्हे मिरवीत आपल्या नगरीत आनंदाने प्रवेश करतात आणि येथे कथानक संपते.

प्रस्तुत काव्य घटनाप्रधान आहे. ह्या काव्यातील संघर्षाचे बीज कृष्णाच्या प्रेमरहस्यामुळे कृष्णस्त्रियांच्या मनात निर्माण झालेल्या कोपात आहे. शुकाच्या चतुरोक्तीने त्यांचा कोप जातो खरा; पण त्याच कारणाने बलराम युद्धास प्रवृत्त होतो. शुकाची जी उक्ती एका संघर्षाचा शेवट करण्यास कारणीभूत होते, तीच उक्ती एका नव्या संघर्षास जन्म देणारीही ठरते. असे असूनही काव्याच्या एकात्मकतेस कुठेही धक्का लागला नाही. एका परीने यात Comedy of errors चा अनुभव येतो. युद्धाचे खरे कारण शुक, कृष्ण, गरुड या तिघांशिवाय कुणालाच ज्ञात होत नाही. रहस्याचा शेवटपर्यंत स्फोट न होताही काव्य सुखान्त होते.

ह्या काव्याचे कथाशिल्प सुसंघटित, प्रमाणबद्ध व बंदिस्त असे आहे. कथानकातील विविध धाग्यांची गुंफण मोठी कौशल्यपूर्ण व योजनाबद्ध आहे. एखाद्या नाटकाप्रमाणे अधले मधले प्रसंग टिपून ते पुन्हा व्यवस्थित जोडले आहेत. चवथ्या उल्लासात कृष्णसख्या कृष्णाकडे जावयास निघतात; पण पुढच्या पाचव्या व सहाव्या उल्लासात त्यांच्या भेटीचे वर्णन न करता युद्धाचा प्रसंग चित्रिला आहे. कृष्ण व त्याच्या स्त्रियांची भेट सातव्या उल्लासात दाखविली आहे. व परत युद्धाचे वर्णन आठव्या उल्लासात आले आहे. प्रसंगांची योग्य ती गुंतागुंत साधल्यामुळे उत्कंठा, विस्मय, अपेक्षापूर्ती इत्यादी नाटचरचनेला आवश्यक मानले जाणारे गुणधर्म ह्या काव्यात एकवटले आहेत. यामुळे या काव्याला एक प्रकारचे नाटचमूल्य आले आहे. आपण जणू नाटकातले एकामागून एक अंक पाहत आहोत असेच वाटते. कथानकाला प्रारंभी मिळालेली गती, पुढची प्रगती व शेवटची गोड परिणती श्रृंखलाबद्धरीतीने साधली आहे.

कथावस्तूची मांडणी करतानाही रसोत्कर्षाला पोषक होईल असाच उल्लासाचा क्रम ठेवला आहे. पहिल्या दोन उल्लासांत विप्रलंभ श्रृंगार, तिसऱ्या उल्लासात मीलन-श्रृंगार, चवथ्या उल्लासात करुणरसाभास, पाचव्या व सहाव्या उल्लासांत युद्धवर्णनामुळे वीररसाला मिळालेला उठाव, सातव्या उल्लासात मीलन-श्रृंगार, आठवा उल्लास परत वीररसपूर्ण व नवव्या उल्लासात परत श्रृंगारविलास आढळून येतो.

## चित्रमयता

प्रसंगांच्या सुरेख गुंफणीबरोबर वर्ण्यवस्तूच्या सूक्ष्म चित्रणामुळेही ह्या काव्याला एक प्रकारची दृश्यात्मकता आली आहे. विविध आंगिक भाव दाखवून

त्यांनी हा परिणाम साधला आहे. मनोरमेने शुकास डाव्या हाताने धरून उजव्या हाताने नमन करणे (२-२५), गरुडावर आरूढ होण्यापूर्वी मनोरमेने पदराच्या टोकाने डोळे पुसणे (२-४३), गुप्तचराने कृष्णाच्या कानात कुजबुजणे (४-५), कृष्णाने डोळ्यांनी संकेत करून इतरांना दूर जावयास सांगणे (४-६), चंपक-वृक्षाला टेकून आकाशाकडे दृष्टी लावून कृष्णाने मनोरमेची प्रतीक्षा करणे (२-५८), कृष्णस्त्रियांनी परस्परांची बोटे धरून कृष्णास भेटावयास निघणे (७-७), मधुपानाने मत्त झालेल्या कृष्णस्त्रियांच्या हातून मद्याचे पेले खाली गळून पडणे (७-४५), इत्यादी वर्णनातून ती ती दृश्ये कवीने जिवंत उभी केली आहेत.

तसेच नवव्या उल्लासातील वारवनितांचे नृत्यही असेच दृश्यात्मक पद्धतीने चित्रिले आहे. त्यांचे मध्येच उभे ठाकणे, ठुमकणे, हळू डोलणे, हसणे, बोलणे व इतर अभिनय यांतून रंगमंचावरील दृश्य आपण पाहात आहोत असा भास होतो. तसेच त्यांच्या अंगावरील तळपणारी भूषणे, झळकणारे चुडे, चमकणाऱ्या कंचुकी यांचे प्रत्ययकारी वर्णन आले आहे. घामामुळे कंचुकी अंगाला चिकटली आहे, मुखावरील स्वेदबिंदु त्या पुसत आहेत, हार नीट करून पदर सावरीत आहेत, कानांतील सैल दागिन्यांना नयनांचे चुंबन घडत आहे, कृष्णाला वश करण्या-करिता त्या डोळे मोडीत आहेत, तो वश होत नाही म्हणून आश्चर्याने नाकावर बोट ठेवीत आहेत. . . या वर्णनातून एकंदर प्रसंगाला साक्षात् करण्याचा कवीने यशस्वी प्रयत्न केला आहे. तसेच रसिकांच्या श्रुतींना ह्या जिवंतपणाचा तेवढाच प्रत्यय यावा म्हणून 'धिमिधिमि,' 'रुणझुण,' 'थै थै' अशा ध्वन्यनुकूल शब्दांची योजना करून वाद्याचा व नृत्याचा आवाज साकार केला आहे.

## संवाद

प्रस्तुत काव्याला नाटचात्मकता येण्याचे आणखी एक कारण म्हणजे प्रत्यक्ष कथनापेक्षा कवीने संवादांवर दिलेला भर. संवादांनी काव्याचा फार मोठा भाग व्यापला असून त्याशिवाय एकही उल्लास आढळणार नाही. एकाच उल्लासात तीन चार पात्रेही संवादात भाग घेताना दिसतात. संवादांतील उत्तर-प्रत्युत्तरे मार्मिक असून त्या त्या व्यक्तींच्या त्या त्या वेळच्या मनोवस्था त्यातून समुचित रीतीने व्यक्त झाल्या आहेत. मनोरमा व तिच्या सख्या, मनोरमा व शुक (उल्लास २), बलराम व चित्रसेन (उल्लास ५) तसेच कृष्ण व विचित्रसेन (उल्लास ८) यांच्यातील संवाद ह्या दृष्टीने पाहण्यासारखे आहेत.

## विनोद

ह्या काव्याला न कळत मिष्किल अशा विनोदाची किनार लाभली आहे. शुक– कृष्णस्त्रिया (उल्लास, ४) तसेच कृष्ण-कृष्णस्त्रिया (उल्लास, ७) यांच्या संवादांत याची प्रचीती येते. यापेक्षाही मनुष्यस्वभावाच्या इंगितावर प्रकाश टाकणारा स्वभावजन्य मार्मिक विनोदही कवीने साधला आहे. नवव्या उल्लासात युद्धसमाप्तीनंतर बलराम कृष्णाच्या सुरक्षिततेबद्दल आनंद व्यक्त करतो (९-७). यावेळी शुक व गरुड बलरामाला न कळत परस्परांकडे पाहून हसतात, व बलरामाला झालेल्या आश्चर्यात स्वतःही तसाच आविर्भाव दाखवून सामील होतात. याप्रमाणे युद्धाचे खरे कारण व कृष्णाची सुरक्षितता बलरामापासून लपवून ठेवण्यात येते. असाच स्वभावजन्य विनोद सातव्या उल्लासाच्या चौतीसाव्या श्लोकातही आला आहे. सर्व गोष्टींना कारण असलेल्या शुकाची नामानिराळी राहण्याची तऱ्हा एका दृष्टीने वास्तवाला स्पर्श करणारीही आहे.

हे काव्य घटनाप्रधान असल्यामुळे कल्पनाविलासाच्या मागे लागून कुठल्याही वर्णनावर कवीने तसा भर दिला नाही. शुक मनोरमेकडे कृष्णाचा दूत म्हणून जातो, गरुड मनोरमेला कृष्णाकडे घेऊन येतो व परत नेतो, कृष्णसख्या कृष्णास भेटावयास जातात; पण कुठेही त्यांच्या प्रवासाचे वर्णन करण्यात किंवा त्या निमित्ताने निसर्गाचे दर्शन घडविण्यात कवी गुंतला नाही. कवीने मुख्य कथावस्तूपासून आपले लक्ष कुठेही विचलित होऊ दिले नाही.

काव्यात घटनांना प्राधान्य देण्याच्या प्रवृत्तीमुळे पात्रांच्या स्वभावचित्रणास गौण स्थान मिळाले. एका परीने काव्याचा कांही भाग हलक्या फुलक्या सुखात्मिके (Light comedy) सारखा वठला आहे. शुकाच्या व कृष्णाच्या चतुरोक्तीतील खोच लक्षात न आलेली दाखविणे, बलरामाने गुप्तचरावर विश्वासून वार्तेच्या खऱ्या-खोटयाचा पडताळा न घेता सरळ सैन्य घेऊन युद्धास निघणे, यावरून कवीची घटनांवरच भर देण्याची दृष्टी स्पष्ट दिसते. असे असूनही शुकाचे स्वभावचित्रण रेखाटण्यात कवीने बरीच कल्पकता दाखविली आहे.

## शुक

यातील प्रधान पात्र शुक असून एवढे जिवंत चित्रण अन्य पात्रांच्या बाबतीत कवीला साधले नाही. तो मोठा धीमंत, विवेकी, चतुर व मधुरभाषी दाखविला

आहे. त्याच्या ठिकाणी असणाऱ्या चाणाक्षपणामुळे तो दूतकर्मात यशस्वी होतो, रुष्ट कृष्णसख्यांना कृष्णानुकूल करतो व कृष्णाला महत्त्वाच्या प्रसंगी सल्ला देतो. कृष्णाला युद्धप्रवृत्त करण्याची कामगिरी त्याचीच. युद्धाचा प्रारंभ व उपशम याच्यामुळेच झाला असेही म्हणता येईल. काव्यातील बऱ्याच घटनांना तोच केवळ कारण आहे. यामुळे कथेतील घटनाक्रमात याचे स्थान महत्त्वाचे आहे.

## शुकच कां ?

महाकाव्यात दूत असावा या संकेतानुसार कवीने लीलाशुकाची योजना केली आहे. दूत म्हणून शुक निवडण्यात कवीने मोठे औचित्य दाखविले आहे. भागवत हे प्रत्यक्ष शुका(चार्या)नीच सांगितले आहे. व्यासाचे पुत्र असलेल्या शुकाचार्यांचा जन्म शुकीरूपी घृताची अप्सराच्या योगे झाला. म्हणून त्यास शुक हे नाव प्राप्त झाले. "भागवत हे वेदरूपी कल्पवृक्षाचे पिकलेले फळ शुकदेवरूप पोपटाच्या मुखस्पर्शाने परमानंददायक अमृताने परिपूर्ण आहे," असे भागवतातील पहिल्याच अध्यायात[४१] म्हटले आहे. येथे शुकावर पोपटाचे रूपक केले आहे. श्यामराजाने शुकाचार्यांच्या कांही गुणविशेषांची छटा लीलाशुकाजवळ असल्याचे दाखविले आहे. लीलाशुक हा शुकाचार्यांप्रमाणेच विरक्त आहे. मनोरमेने दिलेल्या सुवर्णरंभाफलाचा अस्वीकार करताना तो म्हणतो, "कामासक्त लोक रंभाफळाची इच्छा करतात, तर निष्काम लोकांना कृष्णभक्तीतच गोडी वाटते." 'रंभा' ह्या शब्दाचा गर्भितार्थ शुकाचार्यांची आठवण करून देणारा आहे. तसेच सातव्या उल्लासात सर्व जण मद्यपान करतात; पण शुक मात्र मद्य घेत नाही. त्याकरिता शुकाने दिलेले कारण भागवतात परीक्षित राजाच्या आक्षेपाला उत्तर देताना शुकाचार्यांने मांडलेल्या युक्तिवादाशी साम्य ठेवणारे आहे.[४२] कवीने लीलाशुकास मुनि (१–४४), ज्ञानी (२-२३), योगींद्र (४-३८), अशा विशेषणांनी संबोधले

४१. निगमकल्पतरोर्गलितं फलं । शुकमुखादमृतद्रवसंयुतम्
पिबत भागवतमं रसमालयं । मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ।। १-१-३ ।।

४२. रा. गो. वि. - केलें हरें दुर्विषपान तैसें । या पामरानीं करिजेल कैसें
ऐसें हरि त्वच्चरित स्मरावें । आम्ही जनीं निश्चित नाचरावें
।। ७-५२ ।।

श्रीमद्भागवत-नैतत् समाचरेज्जातु मनसापि ह्यनीश्वरः ।
विनश्यत्याचरन् मौढ्याद्यथारुद्रोऽब्धिजं विषम् ।। १०-३३-३१।।

असून दुसऱ्या उल्लासात त्यास साक्षात् शुक (साक्षाच्छुक, २-२३) असे म्हटले आहे. यावरून कवीने लीलाशुकाच्या कांही गुणविशेषांचे शुकाचार्यांच्या गुणांशी साम्य कल्पिले आहे असे आढळून येते.

## श्रीकृष्ण

कवीस शुकाएवढे जिवंत चित्रण कृष्णाच्या बाबतीत साधले नाही. रघुनाथ पंडिताच्या 'दमयंती-स्वयंवरा'त ही हंसाला जे स्थान आहे, ते नळास नाही. दूतपर काव्यात दूताच्या व्यक्तिचित्रणावरच कवी विशेष लक्ष केंद्रित करतात असे दिसते. तरीपण कृष्णाच्या स्वभावाच्या कांही छटा लक्षणीय आहेत. कवीने कृष्णास मानवी भाव-विकारांनीयुक्त दाखविला आहे. त्याला मनोरमेपायी होणारा विरह, मनोरमेकडे संदेश पोंचवून आलेल्या शुकास तिच्यासंबंधाने आतुरतेने केलेली पृच्छा, तिच्या वाटेकडे डोळे लावून केलेली प्रतीक्षा यातून एका मानवी प्रियकराचे अंतःकरण कवीने दाखविले आहे. तसेच कृष्ण धर्म आणि काम यांचा समन्वयही साधताना दिसतो. मनोरमेच्या सुखसंगतीत रमणारा, नायिकां-समवेत जलक्रीडा व मधुपान करणारा विलासी कृष्ण प्रसंग येताच आसक्तीचे पाश बाजूला सारून युद्धासही सज्ज होतो. पण शुकाला त्यासाठी प्रार्थना करावी लागते. कांही ठिकाणी स्वतंत्रपणे निर्णय घेण्याचे कार्य कृष्ण करीत नाही. तसेच युद्धासारख्या प्रसंगांतून श्रीकृष्णाची कृती दिसली तरी त्यामागचे भाव आपणांस जाणवत नाहीत. यामुळे त्याच्या विलास-शृंगाराचाच तेवढा आपल्या मनावर प्रभाव पडतो.

## मनोरमा

मनोरमा हे पात्र पहिल्या तीन उल्लासातच आले असले तरी ते बरेच चित्तवेधक उतरले आहे. अत्यंत मर्यादित वाव असूनही तिच्या व्यक्तित्त्वाला एक प्रकारचा रेखीवपणा आहे. विशेषतः कृष्णासाठी तळमळणाऱ्या तिच्या मनातील आशा-निराशेची आंदोलने–

**हरिविण क्षण माझा प्राण राहो सकेना**
**परि विभुकरुणेची भीड बोलांडवेना ॥ २-६ ॥**

या शब्दांतून तेवढ्याच तरलपणे टिपली आहेत. तसेच कृष्णभेटीची आशा हरवून बसलेल्या मनोरमेची मनःस्थिती –

**मुरारातीं रातीं किति किति अशा लोटविल कीं ॥ २-१४ ॥**

अशी वर्णून कृष्णाशिवाय कंठाव्या लागणाऱ्या अनेक रात्रींचा प्रदीर्घ कंटाळवाणे-पणा चारदोन शब्दांतूनच साकार केला आहे. कृष्णभेटीत तिच्या विनम्र व लीन वृत्तीचा प्रत्यय येतो. स्वगृही परत आल्यावर गरुडाला निरोप देण्यातही तिची स्त्रीसुलभ भावुकता व सहृदयता प्रकट होते. मनोरमेच्या व्यक्तिचित्रणातील ह्या नाजुक रंगरेखांमुळे तिचे पात्र परिणामकारक वठले आहे.

मनोरमा हे कवीने निर्माण केलेले काल्पनिक पात्र होय. तिचा उल्लेख कृष्णाच्या संदर्भात कोणत्याही पुराणात आला नाही. कृष्णाच्या अष्टनायिकांत तिचे नाव नाही. सोळा हजार एकशे आठ स्त्रियांपेक्षा ही स्त्री वेगळी असल्याचा उल्लेख कवीने स्पष्टच केला आहे.

**सेवापरा शतसहस्र मनोभिरामा**
**रामामणी रमविती व्रजसार्वभौमा**
**श्रीरुक्मिणी मुखरिणी वरि अष्टकांता**
**त्यांहूनि तूं अधिक आवडसी अनंता ॥ २-३० ॥**

मनोरमा नावाच्या रूपसुंदर अप्सरेचा उल्लेख जयदेव कवीने 'गीतगोविंदा'त राधेच्या संदर्भात केला आहे. तिथे कलावती ही अप्सराही त्याच संदर्भात आली आहे. प्रस्तुत कवीस आपल्या नायिकेस 'मनोरमा' हे नाव देण्याची कल्पना 'गीतगोविंदा'वरून सुचली असावी. मनोरमेची तुलना कलावती ह्या अप्सरेशी केलेली प्रस्तुत काव्यात आढळते (३-३०), हेही या दृष्टीने महत्त्वाचे आहे.

प्रस्तुत काव्यात रुक्मिणी ह्या पात्राचा पार्श्वभूमीदाखल उपयोग करून घेण्यात कवीने बरीच सद्भिरुची दाखविली आहे. ती काव्यात प्रत्यक्ष कुठे वावरत नाही. शेवटच्या उल्लासात ती आली असली तरी ती कुणाशीही बोलताना दाखविलेली नाही. तिचे मूक अस्तित्वच मोठे परिणामकारी झाले आहे. काव्या-तील प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष अनेक सूचनांद्वारे (३-१९, ४-८) तिच्याविषयी वाचकाच्या मनात थोर आदरभाव निर्माण करण्यात कवी यशस्वी झाला आहे.

## कल्पनासौंदर्य

प्रस्तुत काव्यातील कल्पनासृष्टी संस्कृत साहित्यातील अलंकारिकतेची आठवण करून देणारी आहे. अनेक कल्पना सांकेतिक असल्या तरी कवीच्या स्वतंत्र, समुचित शब्दयोजनेमुळे व सहज प्रवाही शैलीमुळे त्यांतील सौंदर्य उठून

दिसते. कांही कल्पना कवि-प्रतिभानिर्मित वाटतात; पण पंडित कवीच्या संदर्भात असे विधान थोडे जपूनच करावे लागते. हे सर्व लक्षात वागवूनही काव्यातील कांही कल्पना मोठ्या हृद्य उतरल्या आहेत, असे दिसून येईल.

मनोरमेच्या गळ्यातील नीलमण्याचे घननीळ कृष्णाशी दाखविलेले साम्य अनेक दृष्टींनी विलोभनीय आहे.

**उरोभूषणीं ते महानीळ वाहे**
**गमे ध्यानरूपें हरी व्यक्त आहे ।। २-४६ ।।**

तसेच कृष्णाच्या मनात उदित झालेल्या मनोरमेविषयीच्या कामभावाचे सूचन—

**हर्म्यांतरीं मदनमंगलदीपिकेशीं**
**सस्नेह सद्‌गुणवती स्फुरली सुकेशी ।। १-२६ ।।**

असे दाखवून त्यात प्रत्ययकारिता आणली आहे. १-२२ मधील सुंदर कल्पनेस श्रीमद्‌भागवताचा[४३] आधार आहे.

तिसऱ्या उल्लासातील क्रीडाशैलाचे वर्णन सांकेतिक असले तरी त्यातील वैभवसंपन्न, अद्‌भुत व आल्हादक वातावरणाचा आपल्या मनावर प्रभाव पडल्याशिवाय राहत नाही. नवव्या उल्लासातील कृष्णाच्या स्वागतार्थं जमलेल्या पौरवधूंचे– तामीळ, गुर्जरदेशीय, महाराष्ट्रीय, रामानुजपंथी, माध्वपंथी– हावभाव, त्यांची आभरणे, आभूषणे त्या त्या वैशिष्ट्यांसह यथार्थपणे चित्रित केली आहेत. वारवनितांचे कृष्णाकडे आकर्षिले जाणे म्हणजे कामचंद्रोदयाने लावण्यसिंधूला आलेली भरती किंवा कृष्णरूपी काळ्या घनात तळपणाऱ्या विद्युल्लता (९-४४). या सर्व रेखाटणातून कवीने नयनाला दिपविणारी एक मनोहर चित्राकृती सिद्ध केली आहे.

कवीने स्त्रीवर वेलीचे रूपक अनेक ठिकाणी केले असले तरी त्यात विविधता आणली आहे. कृष्णाच्या भेटीस निघालेल्या स्त्रिया ह्या वेली असून त्यांच्या अंगावरील दागिने ही फुले व वाळ्यांचा आवाज म्हणजे भुंग्यांचा

---

४३. तं काचिन्नेत्ररन्ध्रेण हृदिकृत्य निमील्य च ।
पुलकाङ्‌ग्युपगुह्यास्ते योगीवानन्दसम्प्लुता ।। १०-३२-८ ।।

गुंजारव होय, असे सांग रूपक केले आहे (७-९). कधी दागिने ही स्त्रीवेलीवरची फुले होतात, तर कधी 'हैमीलते'वर 'स्तनपुष्पगुच्छ' दिसतो (९-३२).

ढग-वीज ह्या प्रतिमांचा उपयोगही निरनिराळ्या संदर्भांत केला आहे. घननीळ कृष्ण व सुवर्णांगी मनोरमा ह्यांचे साहचर्य ढग-वीजेप्रमाणे वाटल्यामुळे मोर नाचू लागले (३-७).

पंडित कवी शब्दालंकारांना महत्त्वाचे स्थान देतात. प्रस्तुत काव्यात कवीने विविध शब्दालंकार साधले असले तरी त्यांचा हव्यास धरून कुठेही कृत्रिमता येऊ दिली नाही. अनुप्रास-यमकादी शब्दालंकार सहजतेने साधले आहेत.

**– दिग्वर्गखर्वकरशर्वविलासशीले ।। ५-६२ ।।**

**– सलीलसलिलांजली ललितशोणपद्मेक्षणा ।। ७-५७ ।।**

यासारख्या अनुप्रासांतून त्या त्या भावनांचे यथायोग्य पोषणही होते. तसेच ८-३६, ८-४१, ८-५१, ९-२२ यांतील दामयमकाची योजनाही अशीच अकृत्रिम वठली आहे. नवव्या उल्लासात 'चंद्रा'च्या योजनेतून शब्दचमत्कृतीबरोबर अर्थ-रमणीयत्वही आले आहे.

**चंद्रोपलीं निर्मित चंद्रशाला**
**बाह्यांगणीं चंद्रमुखी सुशीला**
**चंद्रान्वयांभोनिधिचंद्रसंगें**
**चंद्रोदयीं क्रीडति सांद्रभोगें ।। ९-५९ ।।**

## रसाविष्कार

या काव्यात शृंगार आणि वीर या दोन रसांना प्राधान्य देण्यात आले आहे. कृष्ण आणि मनोरमा ह्यांपैकी मनोरमेचा विरह अधिक भावनोत्कट आहे. तिच्या ठिकाणी दाखविलेल्या कोमल भावांमुळे तिच्या विरहाला एक प्रकारची मधुरता आली आहे.

या काव्यातील मीलन-शृंगार मात्र बरेच उत्तान स्वरूप धारण करतो. तिसऱ्या उल्लासातील रतिक्रीडेचे वर्णन व सातव्या उल्लासातील जलक्रीडेच्या संदर्भातील कांही भाग यादृष्टीने जाणवणारा आहे. पण याचे कारण त्या

काळच्या एकंदर वाङ्मयस्वरूपातच शोधावे लागेल. ही उत्तानता तंजावरकडील मराठी काव्यातच नाही, तर मंदिराच्या उत्सवात जनसमूहापुढे करावयाच्या यक्षगान नाटकांतसुद्धा आढळते. ऐश्वर्यवान राजांच्या आश्रयाखाली वाढलेले अनेक कविपंडित अशी वर्णने गर्हणीय समजत नसत. एका दृष्टीने हा त्या काळाचा प्रभाव असूनै तेलुगु साहित्याने मराठीवरही ताण केली आहे. प्रसिद्ध तेलुगु साहित्यिक श्री. विश्वनाथ सत्यनारायण ह्यांनी यासंबंधी केलेले विवेचन[४४] तंजावरकडील तेलुगु साहित्याचे स्वरूप स्पष्ट करणारे आहे. तेलुगु साहित्याच्या संपर्कामुळे मराठी साहित्यावर हा परिणाम झाला असावा. संस्कृत साहित्यातही सुरत-शृंगाराची वर्णने कांही कमी नाहीत. 'गीतगोविंद,' कृष्णचरित्रपर पुराणे व संस्कृत विदग्ध महाकाव्यातही शृंगाराचे गडद चित्रण आले आहे. संस्कृत साहित्याबरहुकुम काव्य निर्मिण्याचा (Revivalism) तो काळ होता, हे लक्षात वागविल्यास या संबंधात योग्य ती संगती लागू शकते.

तसेच 'सुरतक्रीडा' व 'जलक्रीडा' हे महाकाव्याच्या सर्वमान्य लक्षणांत मोडतात. त्यांचे वर्णन केल्याशिवाय आपले काव्य सर्वार्थाने महाकाव्य होणार नाही, ह्या भावनेपोटी त्यांचा अंतर्भाव कवीने काव्यात केला असल्यास नवल नाही.

'राजगोपालविलासा'तील उत्तान वाटणाऱ्या शृंगार-वर्णनांचा विचार करताना त्याकडे ह्या ऐतिहासिक व वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून पाहणे संयुक्तिक ठरेल असे वाटते.

ह्या काव्याला लाभलेला 'भक्ती'चा स्पर्श अगदीच वरवरचा आहे. कृष्ण-मनोरमा यांच्या मीलनाच्या संदर्भात आलेल्या तुरियादी अवस्थांचा उल्लेख व इतरत्र एक दोन ठिकाणी आलेले भक्तिविषयक निर्देश एकंदर शृंगार-विलासाच्या वातावरणात उपरे व आगंतुक वाटतात. केवळ एक उपचार म्हणून कवीने तसे लिहिले असेच कुणासही वाटेल.

प्रस्तुत 'राजगोपालविलास' हे काव्य श्यामराज कवीची स्वतंत्र निर्मिती होय. यातील मूळ कथावस्तूस कुठल्याही पुराणाचा किंवा महाकाव्याचा आधार सापडत नाही. कवीने काव्यात कुठल्याही आधाराचा उल्लेख केला नाही. काव्याच्या शेवटी हे 'आत्मनिवेदन' असल्याचे कवी स्पष्टपणे सांगतो.

---

४४. प्रो. के. लक्ष्मीरंजनम् (संपा.), तेलुगु साहित्यका इतिहास, पृ. १८०-१८१.

ह्या राजगोपालविलास मातें
दे आख्यानें नवव्या क्रमातें
तें श्यामराजात्मनिवेदनातें
यें देव-भक्तांतर-ऐक्य नातें ॥ ९-६२ ॥

यावरून ह्या काव्याचा मूलाधार कविप्रतिभा हाच होय, असे स्पष्ट दिसते.

यातील मूळ कथा कविकल्पित असली तरी कांही पुराणग्रंथांचा व मराठी काव्याचा यातील कांही घटकांवर प्रभाव पडलेला आहे.

## पूर्वसूरींचा प्रभाव :

### तेलुगु राजगोपालविलासमु

चेंगल्वा कालकवी ह्या तंजावरच्या विजयराघव नायक याच्या दरबारी असलेल्या कवीने प्रस्तुत ग्रंथाची रचना इ. स. १६३३ मध्ये केली. हे तेलुगूतील 'प्रबंध-काव्य' या प्रकारात मोडते. यात चार आश्वास असून एकूण श्लोकसंख्या चारशे एकावन आहे व चार गद्य परिच्छेद आहेत. ह्या काव्याधारे श्यामराजाने मराठी काव्य रचले असावे असे प्रारंभी वाटले. कारण दोन्ही काव्यांचे नामसाम्य, दोन्ही कवी तंजावरकडील, शिवाय तेलुगु काव्य मराठी काव्याच्या कितीतरी अगोदर निर्माण झालेले. पण अभ्यासांती ह्या दोन्हीत नामसाम्याशिवाय अन्य कोणतेच साम्य नसल्याचे आढळून आले. या ग्रंथात पहिल्या चार उल्लासांत कृष्णाचा अष्टनायिकांबरोबर शृंगार वर्णन केला आहे व तोही अलंकारिक पद्धतीने. रुक्मिणी ही स्वीया, भद्रा ही परकीया, याप्रमाणे संस्कृतातील नायिकांचे भेद अष्टनायिकांच्या ठायी कल्पिले आहेत.[४५] कवीला मुख्यत: दक्षिणद्वारका मन्नारगुडीचे माहात्म्य सांगावयाचे होते, व ते त्याने पाचव्या उल्लासात सांगितले आहे. याप्रमाणे ह्या तेलुगु काव्याचा मराठी 'राजगोपालविलासा'वर परिणाम झाल्याचे दृष्टोत्पत्तीस येत नाही.

४५. "He (the poet) treated the subject from a purely Alankarika point of view, by making them the nayikas of Rasabhava..."
एन्. वेंकटराव (संपा.), राजगोपालविलासमु, प्रस्तावना, पृ. १५.

'राजगोपालविलासमु' नावाचे एक तेलुगु यक्षगान नाटक विजयराघव नायक ह्याच्या नावावर आढळून येते; पण दुर्दैवाने ते उपलब्ध नाही. तेव्हा ह्या तेलुगु कृतीचा मराठी काव्यावर कितपत परिणाम झाला हे समजण्यास सध्या तरी मार्ग नाही.

## हरिवंश

प्रस्तुत काव्याच्या कांही भागावर विशेषत: सातव्या उल्लासावर 'हरिवंशा'चा प्रभाव पडलेला जाणवतो. सातव्या उल्लासात कृष्ण आपल्या सोळा सहस्र स्त्रियांबरोबर केलेल्या जळक्रीडेचे वर्णन आले आहे. हरिवंशातील विष्णुपर्वाच्या ८८-८९ ह्या अध्यायांचा यास आधार आहे. कृष्ण द्वारकेत असता पिंडारक यात्रेच्या निमित्ताने आपल्या सर्व स्त्रियांना घेऊन तो समुद्रात क्रीडा करतो. प्रस्तुत काव्यात समुद्रात कृष्णाचा प्रासाद असल्याचे वर्णन आहे, तर 'हरिवंशा'त कृष्णाच्या सर्व स्त्रियांना पुरेल एवढी मोठी नौका[४६] होती. कृष्ण व त्याच्या स्त्रियांनी परस्परांवर पाणी उडवून जलक्रीडा करणे,[४७] कृष्णाने सोळा सहस्र स्त्रियांइतकी रूपे धारण करून त्यांच्याशी रमणे,[४८] त्यांचे मद्यपान इत्यादी कथाभाग दोन्हीस समान आहे. त्या समुद्रातील अफाट पाण्यात जलक्रीडा करता यावी म्हणून कृष्णकृपेने "घोट्यापर्यंत, गुडघाभर, मांडीइतके अथवा छातीइतके जल त्या त्या स्त्रियांच्या इच्छेप्रमाणे होत असे."[४९] 'राजगोपालविलास' यात मात्र कृष्णाने सोडलेल्या चक्राच्या योगे त्या पोहू लागल्या असे वर्णन आले आहे.

## श्रीमद्भागवत

'राजगोपालविलासा'तील श्लोक १.२२ व ७.५२ यात आलेल्या कल्पनांस श्रीमद्भागवताचा आधार आहे, हे यापूर्वी स्पष्ट केले आहे.

---

४६. परिच्छदस्थानुरूपं यानपात्रं महात्मनः ।
नारायणस्य देवस्य विहितं विश्वकर्मणा ॥ ८८.७८ ॥

४७. सिषिचुः केशवं पत्न्यो धारा इव महोदधिम् ।
सिषेच ताश्च गोविन्दो मेघः फुल्ल लता इव ॥ ८८.२५ ॥

४८. षोडशस्त्री सहस्राणि जले जलजलोचनः ।
रमयामास गोविन्दो विश्वरूपेण सर्वदृक् ॥ ८८.१३ ॥

४९. गुल्फदघ्नं जानुदघ्नमूरुदघ्नमथापि वा ।
नार्यस्ताः स्तनदघ्नं वा जल समभिकांक्षितम् ॥ ८८.२४ ॥

एकोणतीस

## रामदासकृत रामायण-युद्धकांड

'राजगोपालविलासा'च्या पाचव्या व सहाव्या उल्लासांतील युद्धवर्णनावर रामदासाच्या 'युद्धकांडा'चा बराच प्रभाव पडलेला आहे. कवी रामदासी परंपरेतील असल्याने हे युद्धकांड त्याच्या अवलोकनात येणे स्वाभाविक होते.

बाणांच्या साहाय्याने समुद्रास वश करण्याची कल्पना रामायणावरून सुचली असावी. बलराम-चित्रसेन यांच्या युद्धावर रामायणातील इंद्रजिताशी झालेल्या युद्धाची छाया पडलेली दिसते.

रामदासाच्या युद्धकांडातील कांही कल्पना व विशिष्ट शब्दरचना प्रस्तुत काव्यात आढळतात.

'राजगोपालविलासा'तील

**रणीं त्या खणाणा दणाणा सणाणा। ध्वनी ऊठती वीर आले स्फुराणा ॥**
**धबाबा धबाबा गळे रक्त धांवें। अबाबा असा शब्द कांहीं उठावे ॥ ६.३१ ॥**

ही रचना रामदासाच्या शैलीशी साम्य ठेवणारी आहे. दोन्ही काव्यातील समान स्थळे पुढे दिली आहेत.

रा. गो. वि. : **आकाश दुस्तर समुद्र विचित्र नौका**
**मायावती विलसती विचलत्पताका ॥ ६.५२ ॥**

युद्धकांड : **समुद्रोदकीं पूर्ण तारूच जैसें**
**नभामाजि तें चालिलें भव्य तैसें ॥ ११.५७ ॥**

रा. गो. वि. : **गदातोमरें खेटपट्टीशशूलें...**
**किती भिंडिमाला करस्थाग्नियंत्रें**
**किती मारिती वृक्षपाषाणमात्रें ॥ ६.३० ॥**

युद्धकांड : **किती एक घेऊनिया चंडशीला**
**किती एक फीराविती भिंडिमाला**
**किती तोमरे पट्टिशेंशी निघाले**
**किती एक ते शूळ घेउनि आले ॥ ८ २२ ॥**

## एक महाकाव्य

प्रस्तुत काव्यास कवीने सर्वत्र महाकाव्य म्हणून संबोधले आहे.

> **श्रीराजगोपालविलास नांवें**
> **केलें महाकाव्य तयाच देवें...**

असे लिहून प्रत्येक उल्लासाचा शेवट केला आहे. आपल्या काव्यास महाकाव्य म्हणून मान्यता मिळावी असे कवीस सतत वाटत आलेले दिसते. म्हणून महाकाव्याच्या जास्तीत जास्त लक्षणांची परिपूर्ती करण्याचा त्याने आवर्जून प्रयत्न केला.

या काव्यातील प्रमुख रस शृंगार असून त्या खालोखाल वीररसाला स्थान मिळाले आहे. यातील कथा रामायण-महाभारतादी ग्रंथांतून घेतली नसली तरी या कथेतला नायक महाभारत, भागवत, हरिवंश इत्यादी ग्रंथांतून आला आहे.

या काव्यात सर्गाच्या ऐवजी उल्लास आहेत. महाकाव्याच्या नियमाप्रमाणे सर्गांची संख्या आठपेक्षा कमी नसावी. म्हणून कवीने नऊ उल्लासात रचना केली. चारही पुरुषार्थांची प्राप्ती करून देणाऱ्या मन्नारगुडी ह्या क्षेत्राचे माहात्म्य गायिले व कृष्णाचे चित्रण करताना धर्म व काम या दोन पुरुषार्थांना त्याच्या जीवनात स्थान दिले. महाकाव्यात निसर्गातील विशिष्ट दृश्याचे कविकल्पित कारणाने समर्थन हवे. त्यानुसार ह्या लक्षणाची परिपूर्ती १.३५, ३.५ यातून केली आहे. प्रातःकाल, सायंकाळ, ऋतू, समुद्र, नदी, मद्यपान, रतिक्रीडा ह्यांपैकी कांहींचे वर्णन आहे, तर कांहींचा उल्लेखच फक्त आढळतो. मृगया, युद्ध, दूतप्रेषण, विरह, मीलन, पुत्रजन्म, राजनीती यांचाही प्रस्तुत काव्यात समावेश आहे. 'अग्निपुराणा'नुसार असती स्त्रियांना महाकाव्यात स्थान असावे. तोही नियम कवीने पाळला आहे. प्रत्येक सर्ग हा एकाच वृत्तात असून त्याचा शेवट निराळ्या वृत्ताने व्हावा ह्या नियमाचे मात्र कवीने पालन केले नाही. महाकाव्याच्या जवळपास सर्व लक्षणांची परिपूर्ती केल्यामुळे प्रस्तुत काव्यास महाकाव्य म्हणण्यास प्रत्यवाय नाही.

## एक आख्यान-काव्य

प्रस्तुत कवीने स्वतःच्या काव्यास 'आख्यान' म्हणूनही संबोधले आहे. (दे आख्यानें नवव्या क्रमातें, ९-६२.)

ग्रंथारंभी यास 'गोपमनोरमेचे चरित' (आलोकिजें चरित गोपमनोरमेचें, १-६.) असे म्हटले आहे. यातील 'चरित'चा अर्थ वृत्तांत असाच असून 'वाटे गेला उपेंद्र स्वचरित सुचऊं त्या निजेंद्राग्रजाला' (८-१८), ह्या त्यातील अन्य पंक्तीद्वारे उपरोक्त अर्थास पुष्टीच मिळते. यावरून कवीच्या दृष्टीने 'चरित' व 'आख्यान' हे समानार्थक होत. तेव्हा वृत्तांतकथन किंवा कथाकथन हा आख्यान-काव्याचा गाभा होय याची स्पष्ट कल्पना कवीला होती, हे यावरून कळून येते.

प्रस्तुत काव्यातील कथा कुठल्याही इतिहास किंवा पुराण-ग्रंथातून घेतलेली नाही. आख्यान-काव्यातील कथा संस्कृत आर्ष महाकाव्ये किंवा पुराणे यातून घेतलेली असावी, असे कांही समीक्षकांना वाटते. याचे कारण संस्कृत विदग्ध कवींनी व मराठीतील जवळपास सर्व आख्यानकारांनी त्यातूनच कथा घेतल्या आहेत. पण कांही आख्यानकारांनी स्वतंत्र प्रयोगही केले आहेत. प्रस्तुत 'राजगोपालविलास' ही कृती स्वतंत्र असूनही ते एक चांगले आख्यान-काव्य आहे. 'श्रीकृष्णमंजरी' या काव्याचाही या संदर्भात उल्लेख करावयास हरकत नाही. आख्यान-काव्याची विविध अंगे एखाद्या काव्यातून प्रकट होतात की नाही हे पाहाणे महत्त्वाचे असून त्यातील कथेच्या विशिष्ट मूलस्रोतासंबंधी आग्रह धरता येणार नाही.

प्रबंध-काव्यासंबंधीचा विचार यापूर्वी आलेलाच आहे. प्रस्तुत काव्य तेलुगूत असते तर ते एक प्रबंध-काव्य म्हणूनच गणले गेले असते. महाकाव्याच्या नियमांचे आवर्जून पालन करणाऱ्या ह्या कवीने एका उल्लासात एकच वृत्त, ह्या नियमाचे पालन केले नाही. कारण त्याच्यापुढे विविध वृत्तांतून विनटलेल्या तेलुगु प्रबंध-काव्याचा आदर्श होता. कथानकाची अपूर्वता व त्याला मिळालेला नाट्यात्मक घाट याचे विवेचन पूर्वी आलेच आहे.

याप्रमाणे 'राजगोपालविलास' हे महाकाव्याच्या धर्तीवर असलेले एक आख्यान-काव्य असून त्याच्या रूपसिद्धीवर प्रबंध काव्याचाही बराच प्रभाव पडला होता असे दिसून येते.

## भाषिक विशेष

प्रस्तुत काव्य संस्कृतप्रचुर आहे. तत्सम शब्दांचा व शब्दरूपांचा उन्मुक्त वापर व प्रदीर्घ समास आपले लक्ष वेधून घेतात. संस्कृत भाषेचा या काव्यावर

गाढ प्रभाव पडलेला असूनही लोकव्यवहारातील भाषेच्या कांही खुणा अधून मधून आढळतात. त्यावरून तंजावरी मराठीच्या स्वरूपाची थोडीशी कल्पना येते. येथे एकूण भाषिक विशेषांचा थोडक्यात परामर्श घेतला आहे.

— 'ए'कारयुक्त शब्दाचे 'अ'कारयुक्त लेखन आढळते. उदा. निघल (१-२२), म्हणल (२-५१), एकट (४-१६), वाटत (८-१४). या शब्दांतील मध्यवर्णाचा उच्चार दीर्घ होत असला पाहिजे.

— 'ए' या स्वराचे 'य' या अर्धस्वरात रूपांतर झाल्याचेही क्वचित् दिसते. उदा. यखादे (२-५).
तुलना : (अ) "चतुर नर यखादा बोलतो हंस तैसा," द. स्व., श्लो. ११३.
(आ) "असो यखादा नर जाय गावा," रु. च., श्लो. २७.

— कांही वर्णांचा महाप्राण लुप्त होतो.
झ > ज. उदा. जालो (२-५७), जाली (१-४७).
ठ > ट. उदा. साटि (५-३८), मोटचा (६-२६).
तुलना : "यासाटींच विलंबलंब घडला येऊं सुवर्णांबरा", श्री. मं. ॥६-६५॥

— अल्पप्राण वर्णांना महाप्राण प्राप्त झाल्याचेही क्वचित् आढळते.
ज > झ. उदा. अझुणिही (५-११).

— मृदुवर्णाचा कठोर वर्ण झालेला कांही शब्दांतून दिसतो.
ड > ट. उदा. झगटले (३.५८), कवाट (१-१२).
तुलना : रंभेचे कुचकुंभही झगटल्यां कांहीं न जे मोहती," पा. क. पृ. १०.

— विभक्ति प्रत्ययाचा विचार करताना कर्ता प्रथमान्त न ठेवता तृतीयान्त ठेवण्याची प्रवृत्ती कांही ठिकाणी जाणवते. उदा. "पूर्वाण्हीं मृगयेस जात असतां देवें विलासाकुलें" (४-२७). येथे "देवाने शिकारीस जात असतां..." असे वाक्य तयार होते.

— अप्रत्ययी द्वितीयेची रूपेही कांही ठिकाणी दिसतात. उदा. सीरपाणी (५-५४), श्यामकवींद्र (१-४८). तसेच स्थलीं (१-१५) असे द्वितीयेचे रूपही आढळते.

— तृतीया विभक्तीतही अनेक वेळेला प्रत्यय लागत नाहीत. उदा. मंदगती (२.५९), सूक्ष्मबुद्धीं (१-२३), सदुपाय (७-१). विभक्तिप्रत्यय न लागण्याची ही प्रवृत्ती तंजावरी भाषेचे स्वरूप समजावून घेण्याच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण वाटते.

— विभक्तिप्रत्यय किंवा शब्दयोगी अव्यय लागताना कांही नामांतील संयुक्त व्यंजनांचा विश्लेष होतो. उदा. सखियांनी (२-४९), पक्षियाचें (८-८), डोल्हारियावरि (३-२५).

— सर्वनामाचे तां (तूं) (३-४७, ५-५५) हे तृतीयेचे रूप सर्वत्र आढळते.

— संस्कृत भाषेच्या प्रभावामुळे विशेष्यानुसार विशेषणाचे रूप करण्याची प्रवृत्ती अनेक ठिकाणी दिसते. उदा. सुखें समस्तें (१-४६), दीप्तवर्णें सुपर्णें (२-४९) उदंडें वीरमुंडें (६-३३), विविधें विचित्रें रसाळें फळें (३-२२).

— भूतकालीन क्रियापदाची जाला (१-३६), जाहला (२-६७), दिल्हा (२-२६), देखियलें (४-१५), स्थापयिली (३-६९) अशी रूपे आढळतात.

— कृदंताचा भूतकालीन क्रियापदाप्रमाणे उपयोग हे ह्या काव्यातील भाषेचे महत्त्वाचे वैशिष्टच म्हणता येईल. असा प्रयोग इतर प्राचीन काव्यातून आढळून येत असेल असे वाटत नाही. उदा. गमत (२-१), मज्जत (२-३), बोलत (२-४), जाऊनि (२-४), विलोकीत (२-१७).

— आलोकिजें (१-६), आठवीजे (१-७), ऐकिजेली (३-२७), वोलांडवेना (२-६), संरोधिजेलें (६-२३) अशी जुनी कर्मणीची रूपे सर्वत्र आढळतात.

— शोधऊनि (९-२३), लोपवीली (५-३४), आणवील्या (७-१४), पिवउनि (४-३५) अशी प्रयोजक रूपे आली आहेत.

— कांही नामधातू वैशिष्टचपूर्ण असून त्यामुळे काव्याला एक प्रकारचा सुटसुटीतपणा आला आहे. उदा. मुकुळल्या (१-२), चमत्करी (२-२१), घनावते (२-४५), प्रवाहती (३-४), प्रपंची (३-३१), शंकल्या (४-११), नवशिलें (५-२७), नवलावला (५-५०), प्रलपली (६-४), क्रीडलें (८-२३), नादावली (८-३०), प्रबळले (८-४२), आनंदती (९-६०), द्योतती (९-६१).

## कांही विशेष शब्द व वाक्‌प्रचार

**वोडउनि** (=पुढे करून)–उदा. आज्ञेस त्या वोडउनी स्वमाथां ॥५-१४॥ तुलना : "हें सत्य चंचुपुट वोढविलें शुकानें," द. स्व. श्लो. ६७. 'वोडवणें' याचा नेहमीप्रमाणे 'ओढवणे' या अर्थीही प्रयोग केला आहे. उदा. "मायावतीं प्रलय वोडवला अपैसा" ॥ ८-४६ ॥

'**घट**' (=घडणे) ह्या धातूपासून क्रियापदाची अनेक अर्थी रूपे साधलेली आहेत.

(अ) **घटित करणे** (=लावणे)– (पक्ष्मरूपी कपाटें) "घटित करुनि तीनें भोगिलें चित्र मोटें" ॥ १-२२ ॥

(आ) **घडणे** (=होणे)– "आनंदतुंदिलतनू घडली क्षणातें" ॥ २-४३ ॥
रघुनाथ पंडितकृत 'दमयंती-स्वयंवरा'तही ह्या धातूपासून झालेली इतर अर्थाची रूपे आढळून येतात.

(अ) **घटित** (=घडविलेले)– "वोतीव हे न घटिताकृति बोलिजेली,' श्लो. ७२ चा पाठभेद.

(आ) **घटना करणे** (=संबंध जुळविण्यासाठी खटपट करणे)– "आलों सुधांशुमुखि, जे घटना कराया," श्लो. २१६.

**वेंघणे** (=चढणे)– "वेघोनी बळभद्र रुद्र दुसरा कल्पांतिचा भासला" ॥ ५-६ ॥

तुलना : (अ) "हर्म्यावरी वेघुनि पौररामा," श्री. मं. ॥ ९-५० ॥

(आ) "कीं वेवतां गगन चंद्रकला गळाली," रु. च श्लो. ८०.

'भाषाप्रकाश' व 'मराठी भाषेचा तंजावरी कोश' ह्या दोन्ही कोशग्रंथांत 'वेघे' असेच रूप आले आहे.

भाषाप्रकाश : "चढे तो वळघे वेघे," १८-११७.

मराठी भाषेचा तंजावरी कोश : "वेघ–(क्रि.) वळघ, चढ," पृ. १५८.

रघुनाथ पंडिताच्या 'दमयंती-स्वयंवरा'त मात्र 'वेंघे' असे रूप आढळते. उदा. "शृंगारिला हय तयावरि भूप वेंघे," श्लो० ३२. तंजावरकडील महाराष्ट्रीय मात्र बोलताना 'वेघे' असेच निरनुनासिक रूप सध्या वापरतात, हे येथे लक्षात घेण्यासारखे आहे. कदाचित् दोन्ही रूपे रूढ असावीत.

**चित्त किंवा मन शोधणे** (मनातील विचाराचा अदमास घेणे)– उदा. त्वच्चित्तशोधनकरूं मज धाडिलेसें ॥ २-३१ ॥

## समारोप

'राजगोपालविलास' हे पंडिती परंपरेतले काव्य असूनही ते नेहमीच्या वळणाचे वाटत नाही. या काव्याला स्वतःचा एक तोंडवळा, एक वेगळे व स्वतंत्र व्यक्तित्त्व आहे असे म्हणता येईल. कारण यातील कथावस्तू कविप्रतिभानिर्मित आहे. यातील कितीतरी पात्रे व प्रसंग कवीने आपल्या कल्पनेने निर्मिलेली आहेत. पौराणिक आधार कांही ठिकाणी घेतला असला तरी त्यात इष्ट तो बदल कवीने केला आहे. मुख्य म्हणजे कथानकाच्या विकासाची एक विशिष्ट दिशा कवीने अगोदरच कल्पिली व त्या दिशेने वाटचाल केली. अशा ठिकाणी पौराणिक आधार केवळ साधनीभूत ठरतात. कथेचा पूर्ण पट– त्याचे स्वरूप, विस्तार व वळणे ह्यातून कवीने फार मोठे स्वातंत्र्य घेतले आहे. एवढा स्वतंत्रपणा दाखविणारे पंडित कवी प्राचीन कविश्रेणीत मोजकेच आढळून येतील.

कवीने आपली स्वतंत्र भूमिका मूलतःच घेतल्यामुळे एकंदर प्रसंगचित्रणातही निराळेपणा आला. विशेषतः मन्नारगुडीच्या आसमंतातील भौगोलिक स्थळांना त्याने काव्यात आधारभूत मानले. हरिद्रानदीस समुद्र व त्यातील छोटचा कृष्णमंदिरास प्रासाद कल्पिले. बलरामाचे सैन्य-कूच वर्णिताना त्यागेश्वर, पद्मालय, दुर्गा या दक्षिणेकडील प्रसिद्ध स्थळांचा उल्लेख व पुढे विवेचिलेला समुद्र, ह्यांतूनही याचा प्रत्यय येतो.

कवीच्या मनःश्चक्षूपुढे काव्यातील कथेची वाटचाल स्वच्छ अशी उभी असल्यामुळे पहिल्या तीन उल्लासांतील घटनांच्या काळात एक प्रकारची संगती कवीने कळत नकळत ठेवली. (पहिल्या तीन उल्लासांतील घटनांचा कालावधी चोवीस तासांच्या आतील आहे हे काव्यातील निरनिराळ्या कालदर्शक सूचनांवरून –१-३८, २-४, २-१४, २-३८, ४-२७– स्पष्ट होते.) घटनांच्या कालावधीचा

विचार किंवा त्यांतील संगती ह्यास काव्यदृष्ट्या महत्त्व नसले तरी हे काव्य कवीची स्वतंत्र निर्मिती होय, याची खूण यामुळे पटते.

'राजगोपालविलास' या काव्यावर झालेला इतर कृतींचा संस्कार गृहीत धरूनसुद्धा ती एक स्वतंत्र कलाकृती होय, याविषयी दुमत होऊ नये. तसेच कवीच्या ठायी स्वतंत्र कथावस्तू निर्माण करण्याचे सामर्थ्य होते, याचाही काव्याच्या अवलोकनातून पुरेपूर प्रत्यय येतो.

## संहिता–संपादन

प्रस्तुत 'राजगोपालविलास' ह्या काव्याची संहिता सरस्वती महाल ग्रंथालयातील हस्तलिखित क्र. १५०२ ह्या आधारे सिद्ध केली आहे. पूर्ण स्वरूपात उपलब्ध असलेली ही एकमेव प्रत होय.

## हस्तलिखिताचे स्वरूप

हे हस्तलिखित उत्तम स्थितीत असून त्यातील अक्षर सुरेख व वळणदार आहे. ग्रंथाचा आकार २०.५ सें. मि. × ११.५ सें. मि. एवढा असून प्रत्येक पृष्ठात सात ते नऊ ओळी व प्रत्येक ओळीत एकोणवीस ते चोवीस अक्षरे आढळतात. एकूण शंभर पानांचे हे हस्तलिखित आहे.

कागदाच्या स्वरूपावरून पोथी फार जुनी नसावी. ती १२५-१५० वर्षांच्या आतबाहेरील असावी. कागदावर 'मुकुटाचा' (Crown) वॉटरमार्क असून कागदाच्या गर्भातील रेषा स्पष्ट दिसतात. कंपनीचे नाव मात्र कोणत्याच पृष्ठावर दिसले नाही. तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात इ. स. १८०६ च्या पूर्वीचा वॉटरमार्क असलेला कागद अद्याप उपलब्ध झाला नसल्याचे तेथील मराठी पंडित श्री. भीमराव हे सांगतात.

एकूण ५७१ श्लोक असलेल्या ह्या हस्तलिखित ग्रंथाचे वैशिष्टय असे, की त्याच्या मुखपृष्ठावर एकूण 'ग्रंथ'संख्या नमूद केली आहे. 'ग्रंथ १०००' असे त्यावर लिहिले आहे. तसेच प्रत्येक उल्लासाला मुखपृष्ठ असून त्यावर उल्लासाचा क्रम व त्या उल्लासातील ग्रंथसंख्या दिली आहे. त्यानुसार प्रथमोल्लास ८५,

द्वितीयोल्लास ११०, तृतीयोल्लास १२५, चतुर्थोल्लास ७२, पंचमोल्लास १३३, षष्ठोल्लास १०८, सप्तमोल्लास १३०, अष्टमोल्लास ११६ व नवमोल्लास ११५ अशी ग्रंथसंख्या आहे. या सर्व ग्रंथसंख्येची बेरीज मात्र १००० न होता ९९४ एवढी भरते. शिवाय या ग्रंथसंख्येचा प्रत्यक्षाशी मेळ बसत नाही. (ग्रंथ = ३२ अक्षरे).

प्रथमोल्लासाच्या प्रारंभी जसे ईश्वरनमन आले आहे, तसे उल्लास २ (श्रीकृष्णपरमात्मनेनमः), उल्लास ३ (श्रीगोपालकृष्णायनमः), उल्लास ४ (श्रीरामचंद्रायनमः) यांच्या प्रारंभीही ते आले आहे.

## इतर सुटया प्रती

क्र. १५०२ ह्या उपरोक्त संपूर्ण काव्य असलेल्या हस्तलिखिताशिवाय इतर सुटे उल्लास असलेल्या पुढील प्रती तंजावरच्या सरस्वती महाल ग्रंथालयात उपलब्ध आहेत.

हस्तलिखित क्र. २२१३ – १ ते ३ उल्लास.
,, ,, ९५६ – केवळ २ रा उल्लास.
,, ,, ८२१ – केवळ ५ वा उल्लास.

वरील तिन्ही प्रतींतील लेखन कित्येक ठिकाणी अशुद्ध व चुकीचे असून अधुनमधून शब्द सुटलेले आहेत. क्र. २२१३ यात आलेल्या तिसऱ्या उल्लासात श्लो. ३३ मधील तिसऱ्या चरणापासून श्लो. ४० पर्यंतचा भाग गळालेला आहे. आधारभूत प्रतींतील कांही शब्दांचा बोध होण्याच्या दृष्टीने ह्या प्रतींतील योग्य वाटणारे पाठ स्वीकारले आहेत. हे पाठ संख्येने अल्प असल्यामुळे व कांही उल्लासांपुरतेच मर्यादित असल्यामुळे ते संहितेत तळटीपांतून न देता पुढे 'पाठ-स्वीकृती' या शीर्षकाखाली दिले आहेत.

## पाठस्वीकृती

हस्तलिखित क्र. २२१३ व ९५६ यात आलेल्या दुसऱ्या उल्लासातील पाठ सारखेच असल्यामुळे क्र. ९५६ ह्या हस्तलिखिताचा पुढील आलेखात निर्देश केला नाही. संहितेत स्वीकारलेला पाठ* ह्या चिन्हाने दर्शविला आहे. पाठापुढे दिलेले जोड आकडे अनुक्रमे श्लोकक्रम व चरणक्रम दर्शवितात.

| उल्लास क्रम | आधारभूत प्रत क्र. १५०२ उ. १ ते ९ | क्र. २२१३ उ. १–२–३ |
|---|---|---|
| उल्लास पहिला | विलसवी* १४–४ | विलसती |
| उल्लास दुसरा | वाहे २४–१ | राहे* |
| | त्याहूनि* ५२–२ | साहूनि |
| | कानी ६०–२ | मानी* |
| उल्लास तिसरा | दुर्मिल हरी ३२–४ | सौख्यलहरी |
| | मदनाशशी ४९–३ | मदनासिशीं* |
| | हरिबोध तुरा ६९–१ | हरिबोध तो तुरा* |

| उल्लास क्रम | आधारभूत प्रत क्र. १५०२ उ. १ ते ९ | क्र. ८२१ उ. ५ |
|---|---|---|
| उल्लास पाचवा | कीर्तिवाद्यें ५–२ | कीर्तिगद्यें* |
| | तेंहभावे ७–२ | तत्प्रभावें* |
| | शोधिन ९–३ | शोषूनि* |
| | पृष्ठभागीं २१–३ | पृष्ठदेशीं* |
| | पाही २५–२ | कांहीं* |
| | ते शशी ३०–२ | ते तसी* |
| | कुंभजांश ३१–४ | कुंभजात* |
| | जालें ४५–१ | आलें* |
| | नाश आला ४७–१ | नाशनाला* |
| | वीर्यशाली* ५४–१ | सत्त्वशाली |
| | कृपेनें ५६–२ | कृषीनें* |
| | असे ५८–३ | शेषें* |
| | अत्याप्तसें ६२–३ | अत्यंतसें* |
| | इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये उभयसैन्य-युद्धनाम पंचमोल्लास: | इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये बलरामकृत चित्रसेनासुरवधोनाम पंचमोल्लास:* |

## संपादकीय धोरण

१) लेखन शक्यतो यथावत् ठेवले आहे. ते बहुश: जुन्या शुद्धलेखनाप्रमाणे आहे. म्हणून सर्वत्र सगती राखण्याचा प्रयत्न केला आहे.

२) वृत्तांची नावे मुळात नव्हती, ती दिली आहेत.

३) वृत्तनियमाप्रमाणे ऱ्हस्वदीर्घात क्वचित् बदल करावा लागला.

४) संभवनीय अक्षर किंवा अक्षरे कंसात दिली आहेत.

५) लेखनातील हस्तदोष सुधारले आहेत. उदा. नगस्थ ३-१ (नगरस्थ), मयदैत्य ६-१७ (यमदैत्य).

६) तालव्य वर्ण क्वचित् 'य' युक्त आणि क्वचित् 'य' रहित आलेले आहेत. ते शक्यतो व्युत्पत्तीस अनुसरून ठेवले आहेत. अशी स्थळे अर्थात् अत्यंत मोजकीच आहेत. उदा. श्यामराज (शामराज), चार (च्यार).

तेसरिता हरिद्रा॥ संपूर्ण आंगी धरिने त्रपद्मा॥ अभ्यंतरी श्रो
भविसोधसद्मा॥१६॥ जीचे वणिक्पथधने श्रापुरा समत्वें
चिंतामणी वणिज भासति तेमहत्वें॥ राकोदितास्तगत सूर्य
सुधांशुबिंबा॥ ऐशा घटा धरिति रश्मिभरावलंबा॥ १७॥
जियेमाजि च्याऱ्ही पुमर्थी स्वकामें॥ चतुर्वर्ण होउनि केली
स्वधामें॥ तयावेदशास्त्रें पुराणें प्रमोदें॥ पाहा जाहली गं
घपघें विनोदें॥१८॥ याद्वारकें तज नमन्मथभागधेयें॥ ॥४॥

'राजगोपालविलास' ह्या हस्तलिखित ग्रंथाचे एक पृष्ठ.

# प्रथमोल्लास

॥ श्रीगुरुगणपतीष्टदेवताकुलदेवताभ्योनमः ॥ श्रीशुभमस्तु ॥

द्रु. वि. जय जगज्जननादिककारणा
जय जडोद्धरणा भवतारणा
जय पयोब्धि-मनोहर-मंदिरा
जय रमारमणा करुणाकरा ॥ १ ॥

शा. वि. भोगीशानशयेंदुसूर्यनयनालोकप्रभावें करी
मातें आदरिशी तरी नटवितों भाषा नटीचे परी
त्वन्निद्रेकरितां सुखें मुकुळल्या त्वन्नाभिपद्मांतरीं
क्रीडेतें विधीशीं तये विनवितां संकोचतों अंतरीं ॥ २ ॥

इंद्रवज्रा मत्प्रार्थना हे परिसोनि मानें
श्रीकांत कारुण्यनिरीक्षणानें
सेऊनि मातें चतुराननत्वें
वाक् सज्जली सर्व कलामहत्त्वें ॥ ३ ॥

शा. वि. जे धर्मादिपुमर्थ देउनि जनां आली यशें चौकरीं
वाहे श्वेतशुकाब्जपुस्तकमिलद्दिव्याक्षमाळेपरी
ते गद्याद्यनवद्यपद्यविलसत्संगीतविद्याधरी
नाचे मद्रसनेवरी निशिदिनीं वाग्देवता सुंदरी ॥ ४ ॥

स्वागता मत्प्रबंध विलसद्‍बहुलोहा
संत हे परिस ते मिळतां हा
ग्रंथ सर्वहि सुवर्णभरानें
देखती रसिक विस्मयतेनें ॥ ५ ॥

व. ति. यालागि पद्यमय हृद्य सकौतुकाचें
आलोकिजें चरित गोपमनोरमेचें
मी श्यामराज कविराज तुम्हांस ऐसें
विज्ञापितों विबुधहो वरवाग्विलासें ॥ ६ ॥

उपजाति प्रसिद्ध मुक्तिप्रद सातवी जे
जे सज्जनीं संतत आठवीजे
जीशीं विधीनें तुळितां समत्वें
गेली वरी स्वर्गपुरी लघुत्वें ॥ ७ ॥

इंद्रवज्रा जे गोभिलें गोप्रलयें प्रयासी
आवाहिली दक्षिण-दिक्प्रदेशीं
जे सर्वसौभाग्यसुरत्नखाणी
जीच्या निवासें न उरे शिराणी ॥ ८ ॥

,, जीमाजि साक्षाद्विबुधाढ्यमेरू
होऊनि दुष्पारभवाब्धितारू
अनंतरूपें जड उद्धरीतो
श्रीराम नित्योत्सव माजवीतो ॥ ९ ॥

शा. वि. जे श्रीराजित राजराजनगरीपेक्षां क्षमामंडलीं
विख्याता विभवप्रदाननिपुणा सेव्या सुधीमंडलीं
जे प्रत्येक गुरुत्व देत वसवी ज्या भूमिवृंदारका
जे साक्षात्प्रभुराजगोपवसती श्रीदक्षिणद्वारका ॥ १० ॥

शिखरिणी स्वहेमप्राकारीं बुरुज मिरवी मेरूसम जे
स्वनद्यंत्राकारें प्रळयघनसंघास सम जे
निज प्रासादाच्या मणिमय महादीप्तकळसें
करी जे मध्यान्हीं द्युमणि सविशेषें विकळसें ॥ ११ ॥

व. ति. पाताळभेद्यपरिखांतरपूर्णवारी
व्यालोल घोर मकरीं विमतां निवारी
द्वारें कवाटयुगळें प्रबळार्गळांनीं
जे दुर्गमाच गणिली सुरभिद्बलानीं ॥ १२ ॥

मालिनी रथगजहयपत्ती वाहिनी चातुरंगी
हरिघनरस लोटे पौरसिंधूतरंगीं
रुणुझुणु रव होतां गोपुरीं नूपुरांचा
मनिं धरि मदनाचा धाक वैरी पुरांचा ॥ १३ ॥

व. ति. जीमाजि चित्रसदनें वदनें स्तवाया
वाटे सहस्रमुख येक समर्थ व्हाया
वीथीस्वरूप विमला कमला सलीला
पार्श्वद्वयीं विलसवी गृहपद्ममाला ॥ १४ ॥

मालिनी जनकजननिरूपें गोपशोणाब्जवल्ली
सनकमुखमुनींद्रीं जें स्थलीं सेविजेली
कनकसुमनशाली चंपकारण्य जेथें
मन करित तपातें व्हावया वस्ति तेथें ॥ १५ ॥

उपजाति जीमाजि वाहे सुरसा सुरेंद्रा—
समाकृती ते सरिता हरिद्रा
संपूर्ण अंगीं धरि नेत्रपद्मा
अभ्यंतरीं शोभवि सौधसद्मा ॥ १६ ॥

व. ति. जीचे वणिक्पथ धनेशपुरासमत्वें
चिंतामणी वणिज भासति ते महत्त्वें
एकोदितास्तगतसूर्यसुधांशुबिंबा
ऐशा घटा धरिति रश्मिभरावलंबा ॥ १७ ॥

भु. प्र. जियेमाजि चाऱ्ही पुमर्थी स्वकामें
चतुर्वर्ण होऊनि केलीं स्वधामें
तया वेदशास्त्रें पुराणें प्रमोदें
पहा जाहलीं गद्यपद्यें विनोदें ॥ १८ ॥

व. ति. त्या द्वारकेंत जन मन्मथभागधेयें
ऐकोनि दुर्लभ सुरासुर लोभनीयें
रथ्यांतरीं रसिकनायक राजगोपें
लीलाविहारकपटें हरिलीं अमूपें ॥ १९ ॥

वंशस्थ तयांत ते एक विलासशालिनी
मनोरमा नाम सुवर्णमालिनी
गवाक्षमार्गें भुवनैकसुंदरी
विलोकिती होय हरी कृशोदरी ॥ २० ॥

शा. वि. जो गाळीव सुरेंद्र नीलमणिच्या तेजें सुखाकारला
साक्षान्मन्मथ-मन्मथ प्रगटला शृंगार शृंगारला
नीलांभोधरसुंदराकृति तटित्पीतांबरें शोभला
तो गोपाळ कृपाळ देखुनि तये वाटे निधी लाभला ॥ २१ ॥

मालिनी मदनजनक येतां लोचनद्वारदेशें
हृदयसदन जालें व्याप्त कामप्रकाशें
निघल हरि म्हणूनी पक्ष्मरूपीकपाटें
घटित करुनि तीनें भोगिलें चित्र मोटें ॥ २२ ॥

इंद्रवज्रा जो शोधिजें केवळ सूक्ष्मबुद्धीं
तो अंतरंगीं धरितां त्रिशुद्धी
गात्रें समग्रें अति सूक्ष्म जालीं
प्रत्यंगदिव्याभरणें गळालीं ॥ २३॥

वंशस्थ प्रसंग तो जाणुनि सूज्ञ चेटिका
समर्पिती स्वर्णसुपर्णवीटिका
समुद्रिकाकंकणबाहुभूषणें
करीतसे सांत्वन मंजुभाषणें ॥ २४ ॥

शा. वि. त्वंगत्तुंगतुरंगराजतिलकें श्रीराजगोपप्रभू
मंदामंदविचित्रमंडलगती उल्लंघितां मार्गभू
जाला सूचक तीस बंदिचरितस्तोत्रीं जयादिध्वनी
तेणें हृष्ट मनोरमा स्फुट पुन्हां ते देखिली लोचनीं ॥ २५ ॥

व. ति. चक्राकृती फिरवितां हय चक्रपाणी
दृष्टीपुढें झळकली रसिकेंद्रराणी
हर्म्यांतरीं मदनमंगलदीपिकेशीं
सस्नेह सद्गुणवती स्फुरली सुकेशी ॥ २६ ॥

शा. वि. हे खेलन्मणिमालिनी चपलदृक्लीलाजगज्जालिनी
मीनांकस्तनशालिनी मदवती श्रृंगारकल्लोलिनी
कामोद्यानविहारिणी कविनुतक्लेशाब्धिसंतारिणी
डोल्हारा सुखकारिणी मजसवें क्रीडो मनोहारिणी ॥ २७ ॥

व. ति. शौरींगितें स्मर तिचे मनिं सिद्ध जाला
स्त्रीमूळतातसुतसंगरकाळ आला
कीं तो भविष्य-कलि-हेतु असा म्हणूनी
सर्वज्ञ कृष्ण जन मोहवि या विधानीं ॥ २८ ॥

व. ति. सुंदोपसुंद सुरशत्रु असोत तैसें
हे देव धर्मपरिपालक साधु कैसें
प्रत्यक्ष हे पितृविलासरता स्वमाता
ऐसें न येचि सहसा मकरांकचित्ता ॥ २९ ॥

शा. वि. त्यामाजी दृढशाङ्‌र्गकार्मुकमहावज्राभबाणावळी
धर्ता ब्राह्ममहास्त्र सांगकवची श्रीकृष्ण ऐसा बळी
हा तों मोहमृषास्त्रवंत सुतनुस्त्रीभ्रूधनुः सज्जिता
कैसा जिंकिल काम भीरुनयनप्रांताशुगें अच्युता ॥ ३० ॥

उमजाति मनोरमा नाम तिचें म्हणोनी
मनोरमत्वें स्मर सेव्य मानी
रमापदें माधव सिद्ध जाला
दोघांत वेव्हार असा उदेला ॥ ३१ ॥

,, असाधु हें सिद्धमुखें विमानीं
ऐकोनि तो काम विवेक मानी
बापा वधावें अथवा पळावें
हेंही उणें यास्तव आकळावें ॥ ३२ ॥

शा. वि. ऐसा धीर विचार सार करुनी लोकैक वीरें स्मरें
कांहींही रणदुर्धरक्रम नसे केला दयेच्या भरें
लीलाखंजनरंजनाजनमहासंमोहनास्त्राथिला
भीरूभ्रू-विशिखासनाकलितदृक्पद्माशुग प्रेरिला ॥ ३३ ॥

भु. प्र. स्मराचा असा पुष्पनाराच भारी
मनीं भावितां जाहला कैटभारी
स्मरेना विवेकास्त्र संमोहनानें
हरी बद्ध केला मनोनंदनानें ॥ ३४ ॥

मालिनी मुरहरमुखचंद्रा जिंकिलें पद्मबाणें
म्हणउनि विधु-पद्मा वैर अद्यापि होणें
जन्हि निवसति धाकें अब्ज अक्षोभ्य डोहीं
तरि हिमकर यातें बाधितो नित्य पाही ॥ ३५ ॥

व. ति. ऐसा यदूत्तममणी मदनार्त जाला
तैसाच आत्मभवना परतोनि आला
राजोपचार न मनूनि उदासतेनें
एकांत धाम धरिलें दृढ माधवानें ॥ ३६ ॥

उपजाति प्रधान जाऊं न सकेत जेथें
जाईल तों आणिक कोण तेथें
प्रिया सहस्रा रतिरूप आल्या
परंतु कृष्णें अवमानिजेल्या ॥ ३७ ॥

" फिरोनि गेल्या स्वगृहास दारा
तें निंद्य जालें स्थळ त्या उदारा
अस्तंगतार्कें हरतां उबारा
कृष्णीं उदेले विरहार्क बारा ॥ ३८ ॥

" दिनावसानीं अति पश्चिमेतें
प्रकाश येतां गमलें मनातें
मित्राननें जाणुनि कृष्णभेटी
शृंगारते वारुणदिग्वधूटी ॥ ३९ ॥

शिखरिणी मुकुंदें इच्छूनी विजनपद येतां उपवना
विरोधी माध्वीचा मधुपरव त्या पादपवना
तया त्रासें आला मधुपरिपु चांपेयनिकरीं
विरोधी संरोधें धरि सुमन तें माधव शिरीं ॥ ४० ॥

उपजाति वसंत तो माधव नाम वाहे
विधू म्हणे आपण तोच आहे
म्हणोनि ते मित्रपणेंचि आले
श्रीकृष्णचित्तास अमित्र जाले ॥ ४१ ॥

व. ति. त्यामाजि जो यदुकुलार्य सुधांशुलोकीं
विख्यात तो न रुचला विरहज्वरा कीं
तेथें वसंत मधु नांवहि वागवीतां
कैसा सुखी करिल त्या मधुवैरिचित्ता ॥ ४२ ॥

मंदक्रमें मलयनिर्झरशीकरांशीं
घेऊनि चंदनसुगंध समीप देशीं
तो प्राण येत असतां सकळा जनाचा
तो भासला विभुस ईश्वर दक्षिणेचा ॥ ४३ ॥

उपजाति उदास ऐसा व्रजराज चित्तीं
परंतु लीलाशुक मात्र हातीं
धरी प्रमोदें मुनि हा म्हणोनि
तो बोलिला तत्समयीं श्रमोनी ॥ ४४ ।

देवा तवाज्ञकरुना त्रिलोकीं
अलभ्य तें होइल लभ्य लोकीं
त्या तूज चिंता किति लागलीसे
मनोरमा दुर्घट भासलीसे ॥ ४५ ॥

इंद्रवज्रा ऐसें स्वलीलाशुकवाक्यरूपें
मानूनि कर्णामृत राजगोपें
कुर्वाळितां दक्षिण पद्महस्तें
आलीं द्विजेंद्रासि सुखें समस्तें ॥ ४६ ॥

उपजाति चिंतामणी कल्पक कामधेनू
या थोर तूझा हरिहस्त वानूं
मनोरमा कृष्णकरस्थ जाली
म्हणूनि अभ्रीं द्विज झेप घाली ॥ ४७ ॥

,, श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
उल्लास हा आद्य सुहृद्य जाला ॥ ४८ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये मनोरमासंदर्शनजनित-
श्रीराजगोपालविरहवर्णनंनाम प्रथमोल्लास : ॥ १ ॥

## द्वितीयोल्लास

व. ति. श्रीकृष्णपाणि-मणिपंजर-मुक्त-पत्री
जातां नभीं गमत शाङ्र्गविसृष्टपत्री
होऊनि हर्म्यशिखरस्थ मनोरमेचा
शोधी मनोदय तिचा पति जो मतीचा ॥ १ ॥

,, ते चंद्रकांतयुत कांचन-चंद्रशाला
चंद्रोदयें विलसली विमला विशाला
बाह्यांगणीं थबथबी सलिलप्रवाहीं
बाष्पोदकें द्रवति तेवि मनोरमाही ॥ २ ॥

वंशस्थ अमातमीं भीतरिं तारकांगणीं
सुधाकरावांचुनि जेवि रोहिणी
मनोरमा तेवि सखीगणांतरीं
विनाहरी मज्जत दैन्यसागरीं ॥ ३ ॥

,, तयांत ते बोलत मंजुभाषिणी
मनोरमा आणिक एक साजणी
मुकुंद जाऊनि मुहूर्त-सप्तकें
अपार जाला श्रम हें नव्हे निकें ॥ ४ ॥

इंद्रवज्रा
कांहींच संबंध कदापि नाही
क्लेशार्ह जालीस उगीच पाही
तैशीच होशील सुखी यखादे
वेळेस बाळे धृति हे असो दे ॥ ५ ॥

मालिनी
परिसुनि सजणीचे बोल बोले मृगाक्षी
शिव शिव सखि कैशी बोलसी चित्तसाक्षी
हरिविण क्षण माझा प्राण राहो सकेना
परि विभुकरुणेची भीड वोलांडवेना ॥ ६ ॥

,,
हरिविरहित बाई वैर विश्वीं उठावें
अनुभव दृढ जाले आजि वो सर्व ठावे
जड खग मृग तेही कृष्णसंबंध-रीती
शिणविति मज तेथें थोर कां स्वीकरीती ॥ ७ ॥

व. ति.
पक्षीकुळांत खळ वायस नीचजाती
उच्छिष्टभक्षक तदीय पिकद्विजाती
तेही पहा परभृतत्व यदूत्तमातें
आले म्हणूनि वचनें सळितातिं मातें ॥ ८ ॥

उपजाति
हा कृष्णसारंग वृथाभिधाना
जाऊनि जीवें यमसन्निधाना
स्वनाभिनें दाह करी कपाळीं
कैसें सहावें मज लोकपाळीं ॥ ९ ॥

व. ति.
श्रीकृष्ण-भूषण म्हणूनि निजांग कोपें
हे नीलकंठ धरिती दृढ मौन पापें
हा तो वसंतऋतु माधव मी म्हणूनी
उद्दीपितो विरहवन्हि मला जिणोनी ॥ १० ॥

शा. वि. वायू हा मज कृष्णवर्त्म सुहृदे वज्रापरी त्रासितो
तद्वेषी म्हणऊनि शीतकरही चंडांशुसा तावितो
तन्नामें हरिचंदनें प्रदहिलें निश्चेतनें निर्गुणें
तस्मात्कृष्ण जगत्रयाप्त सखिये तेणेंविना धिक् जिणें ॥ ११ ॥

मालिनी मदन तरि तयाचा ज्येष्ठ पुत्र प्रतापें
शमन दमन ज्याच्या तापतो बाणतापें
स्मरुनि हृदयपद्मीं मातृभिद्भार्गवातें
निजजनकविषादें तो वधी युक्त मातें ॥ १२ ॥

भु. प्र. हरी सूत्रधारी दुजें तें न कांहीं
गणी वाहुलीं मी सुरेंद्रादिकांहीं
हरी चेतक स्थावरा जंगमातें
सखे द्योतलें आजि हें सांग मातें ॥ १३ ॥

शिखरिणी किती बोलूं आतां मति शतपथेंही विहरतां
कळों आलें चित्ता हरि न लभिजे रात्रि सरतां
असें मानी माझें हृदय रतलें वृष्णितिलकीं
मुराराती राती किति किति अशा लोटविल कीं ॥ १४ ॥

उपजाति ऐकोनि ऐशा प्रमदाप्रलापा
शुकास आली परमानुकंपा
वरूनि पक्षी वदला सुवाणीं
भेटेल वेगीं तुज चक्रपाणी ॥ १५ ॥

द्रु. वि. गजबजूनि म्हणे गजगामिनी
कवण हे वदली शुभ भामिनी
न कळतां कल मंजुळ भारती
विकळ होय पुन्हां दुसरी सती ॥ १६ ॥

भु. प्र. सखे बोलिली काय आकाशवाणी
असें शंकितां मागुती नीलवेणी
सखी दूसरी चंद्रलेखाभिधाना
विलोकीत बाह्यांगणीं सानुमाना ॥ १७ ॥

उपजाति चहूंकडे देउनि दृष्टि पाहे
रात्रींच सूर्योदय भासताहे
तों हर्म्यमाथां शुक पंचरंगी
विलोकिती होय मनोहरांगी ॥ १८ ॥

वंशस्थ अपूर्व हें ऐकुनिया मनोरमा
सवेग आली निरखूं ससंभ्रमा
अदृष्टपूर्व द्विजरत्न देखिलें
तिच्या मना कौतुक फार वाटलें ॥ १९ ॥

उपजाति कांतामणी साञ्जलि मंजुवाणी
वदे द्विजेंद्रा गुणरत्नखाणी
तूं कोण कोठूनि किमर्थ येथें
आलासि हें सांग यथार्थ पंथें ॥ २० ॥

वंशस्थ दया करी येउनि बैस मत्करीं
मनोज्ञ शब्दें मन हें चमत्करी
सुवर्णरंभाफल तूज राजसा
समर्पितें भाससि गोपराजसा ॥ २१ ॥

उपजाति म्हणे तयेतें शुक ऐक बाळे
रंभाफळीं प्रीति नसे रसाळे
सकाम रंभाफळ वांछिताती
निष्काम ते कृष्णपदीं रहाती ॥ २२ ॥

उपजाति ज्ञानी महा देखुनि दिव्य पक्षी
मानूनि साक्षाच्छुक सारसाक्षी
ममापराध क्षमिजे द्विजेंद्रा
प्रार्थी असी साधु-विवेक-सांद्रा ॥ २३ ॥

स्वागता कृष्णनाम तव आननिं राहे
कृष्णमूर्ति तव लोचनिं आहे
कृष्णरूप मज दर्शन तूझें
भासतें सकळ वैभव माझें ॥ २४ ॥

शा. वि. कर्णानंदन कामिनीवचन हें मानूनि कीरेश्वरें
केलें आगमन प्रसन्न हृदयें कांताकराग्रीं बरें
वामा वामकरीं धरूनि शुक तो वंदूनि वामेतरें
हस्ताब्जें कुरवाळुनी निरखिती जाली मनीं श्रीभरें ॥ २५ ॥

द्रु वि. द्युमणिसा शुककंठमणी पहा
निरखितां नवलाव गमे महा
मग म्हणे रमणी रमणीय हा
तुज दिल्हा कवणें स्फुट वाग्वहा ॥ २६ ॥

शा. वि. पूर्वीं हो यमुनाविहारसमयीं कालीय सर्पें हरी
नेतां स्वीय गृहांत घोर गरुडें आक्रांत केल्यावरी
तेणें धाकुनि आत्मजेसहित हा चूडामणी दीधला
श्रीकृष्णें अति कौतुकें निजकरें माझ्या गळां बांधिला ॥ २७ ॥

उपजाति शुकोक्ति ऐशी रिघतांच कानीं
आबाल्य हा कृष्णसखा म्हणूनी
पुन्हां तया वंदुनि सानुरागें
ते बोलिली स्वागमनार्थ सांगे ॥ २८

व. ति. बोले द्विजेंद्र सखिये तव भाग्य भारी
व्यामोहला तुज विशेष रमाविहारी
जातां मृगाक्षि मृगयेस्तव आजि दैवें
आलोकिलें मुख तुझें जगदादिदेवें ॥ २९ ॥

,, सेवापरा शतसहस्र मनोभिरामा
रामामणी रमविती व्रजसार्वभौमा
श्रीरुक्मिणी मुखरिणी वरि अष्टकांता
त्यांहूनि तूं अधिक आवडसी अनंता ॥ ३० ॥

,, नेघूनिया तुजविना उपभोग कांहीं
चांपेयमध्य वनवास करूनि पाही
शौरी तुझाच पथ पाहत राहिलासे
त्वच्चितशोधन करूं मज धाडिलेसे ॥ ३१ ॥

शिखरिणी शुकें ऐसें साक्षादमृतमथिल्यासारवचनें
सुखी केलें कांताश्रवण मणिताटंककलनें
म्हणे भामा सोमान्वयमणिकृपा तादृशपरी
तुझ्या प्रेमाब्धीच्या उसळति महानंदलहरी ॥ ३२ ॥

व. ति. आतां असो द्विजवरा उपचार साचा
योजी विचार बरवा हरिदर्शनाचा
संग्रामशूर रसिकेंद्र म्हणोनि माझा
कांत प्रसिद्ध दृढ जाणत नाथ तूझा ॥ ३३ ॥

उपजाति तो अश्वकोटीश्वर वीर मोटा
मानी जयाला बलभद्र गाठा
ससैन्य मासैक निशोक्तनेमा
लक्षूनि रक्षी पुरबाह्यसीमा ॥ ३४ ॥

उपजाति पूर्वीं स्वभर्ता रसिकेंद्रनामा
अनेक युद्धीं यदु-सार्वभौमा
कामास येता हरिनें अजेया
संग्रामशूराह्‌वय दीधलें या ॥ ३५ ॥

,, तो आजि पाळी परिसोनि गेला
येईल चंडांशु न जो उदेला
यामाजि कैसा मज कृष्ण भेटे
म्हणोनि कल्पांत मनांत वाटे ॥ ३६ ॥

वि. युवति-दिव्य-मुखाब्ज-सुवाङ्मधू
मधुहर-प्रिय हे असमा वधू
म्हणुनि कीर धुरंधर तोषला
अभय देउनि तीप्रति बोलिला ॥ ३७ ॥

उपजाति मुहूर्तमात्रें प्रमदे धृतीनें
शृंगारणें स्वांग अलंकृतीनें
घे भाक आणीन मुकुंद येथें
नाहीं तरी नेयिन तूज तेथें ॥ ३८ ॥

शा. वि. ऐसें जों वदती शुकेंद्र सुदती तों सन्मती गोपती
कां कीं राग मना विलंब म्हणुनी धाडी सुपर्णाप्रती
येतां तार्क्ष्य-सुपक्ष वायु सुटला श्रीरंग आला असे
बोले पत्रिधुरीण चंद्रवदना संतोषली सौरसें ॥ ३९ ॥

व. ति. तो दिव्यरूपधर दुर्धर वीर्यसिंधू
हर्म्यांगणीं उतरला रविसूतबंधू
विष्णुप्रतापयशमिश्रित मूर्त जाला
ऐसा खगेंद्र गमला रमणीमणीला ॥ ४० ॥

द्रु. वि. शुक म्हणे ललने गुरु आमुचा
विनवि हा परमाप्तच शौरिचा
ममविलंबभरें द्रुत पावला
सदय वाहुनि नेइल तूजला ॥ ४१ ॥

,, मग मराळगती विनयस्थिती
खगवरा करि साञ्जली सन्नुती
फणिरिपू वदला करि वो त्वरा
श्रमत यादवमस्तकिचा तुरा ॥ ४२ ॥

व. ति. कर्णावतंस करुनी गरुडोक्तिपुष्पें
चेलांचलें पुसुनि लोचनपूर्णबाष्पें
ध्यातां सयोग तरुणी यदुनंदनातें
आनंद-तुंदिल-तनू घडली क्षणातें ॥ ४३ ॥

शिखरिणी सुवर्णांगी शृंगारच गमत शृंगाररसिका
तथापी प्रौढा ते यदुवरकटाक्षैककुतुका
धरी स्वांगीं नानाभरणभररत्नोज्ज्वल महा
हरी विद्युद्वर्णा कनकवसनें अद्भुत पहा ॥ ४४ ॥

उपजाति वेणी सख्यांनीं अति शोभवीली
दिव्यानुलेपें तनु लिप्त केली
जे कंचुकी ते न पुरेच बाला
घनावते ते घननीळलीला ॥ ४५ ॥

भु. प्र, उरोभूषणीं ते महानीळ आहे
गमे ध्यानरूपें हरी व्यक्त आहे
अहो देखिली वीज मेघीं परंतू
दिसे मेघ वीजेंत आश्चर्य-हेतू ॥ ४६ ॥

भु. प्र. असो यापरी वर्णितां ते सुवर्णा
पुरेना धणी आनना आणि कर्णां
परि श्रांत तो राजगोपाल आहे
क्षणैका युगप्राय मानूनि पाहे ॥ ४७ ॥

स्वागता त्यावरी हरिखुनी रमणीनें
पक्षिया स्तउनिया बहुमानें
नूपुरद्वय अपूर्व शुकातें
कंठरत्न दिधलें गरुडातें ॥ ४८ ॥

मालिनी तदुपरि विभुसौख्याकारणें दीप्तवर्णें
उचलुनि निजखांदां वाहिली ते सुपर्णें
सकळहि सखियांनीं वंदिली विष्णुयानी
प्रमुदित वदिल्या त्या भाग्य हें कोण वानी ॥ ४९ ॥

उपजाति खगेंद्रखाद्यावरि सत्य भामा
शुकास ते भासत सत्यभामा
हृदिस्थ तीचा हरि बाह्य भासे
भावील त्या तादृश तो उभासे ॥ ५० ॥

स्वागता शाहणा शुक सवें उभयांनीं
चालतां गरुडउद्भटयानीं
भामिनी म्हणल यास्तव लाजे
बोलिला हृदय लोपुनि वोजें ॥ ५१ ॥

भु. प्र. जवोत्कर्ष विख्यात वायूमताचा
महा वेग त्याहूनि तूझ्या त्रिकाचा
परी भीरु हे नास्थिरे अंतरिक्षीं
हळू लोट आटोप आटोपि पक्षी ॥ ५२ ॥

उपजाति रोधूनि कापटचगिरा लगामीं
करूनि तो केवळ मंदगामी
करूं सुखी कीर जनार्दनातें
आला पुढें चंपककाननातें ॥ ५३ ॥

व. ति. जों दृक्पथागत नसे शकुनेंद्र जाला
तों तोष होय शकुनें हरिच्या मनाला
श्रीकृष्ण दक्षिणभुजक्षणविस्फुराणें
आली प्रिया म्हणत काय शुकास देणें ॥ ५४ ॥

द्रु. वि. तंव शुकें विधि जें नलभे भलें
ध्वजयवाब्जसुचिन्हित शोभलें
हरिपदद्वय तें अभिवादिलें
कळरवें विकळत्व विभेदिलें ॥ ५५ ॥

रथोद्धता तर्जि ना म्हणवी तर्जिनी परी
बैसऊनि शुक तीवरी हरी
पूसतां म्हणत तो खगोत्तमा-
रूढली हळुच ये मनोरमा ॥ ५६ ॥

उपजाति मनोरमास्वागमनार्थवाणी
ऐकोनि संतुष्ट रथांगपाणी
म्हणे शुका प्राणसख्या तुझा मी
ऋणस्थ जालों क्षितिदिव्यधामीं ॥ ५७ ॥

,, वदोनि ऐसें करुणार्द्र दृष्टीं
शुकावलोकोनि तिच्याच गोष्टी
पुसे पुन्हां गोप नभानुलक्षी
तो सांगतां होय अभिज्ञ पक्षी ॥ ५८ ॥

व. ति. येरीकडे गरुड मंदगती निघाला
कीं तो सपक्ष गिरिजात असे स्वलीला
कांता सुवर्णलतिकामणिभूषणांनीं
ते मानिली कुसुमिता पुररक्षकांनीं ॥ ५९ ॥

भु. प्र. पहा हे भुजंगारि-खांदां बसूनी
भुजंगांतिका जातसे भी न मानी
असे भाविती यक्षिणी अंतरिक्षीं
पुन्हां ते सभाग्या पहाती निजाक्षीं ॥ ६० ॥

स्वागता देवदिव्यभवनाद्‌भुत हेमें
निर्मिलीं क्रमुनि यादवधामें
इंद्रवाससम सांद्र मणींचा
लंघिला परम सौध हरीचा ॥ ६१ ॥

भु. प्र. पुढें देखिलें चंपकारण्य नेत्रीं
सुपर्णास आले सुरोमांच गात्रीं
सुवर्णोज्ज्वलत्पुष्पराजी विराजे
प्रकाशातिगंधें दिशाप्रांत माजे ॥ ६२ ॥

स्वागता तार्क्ष्यपक्षपवनैकविनोदें
डोलतां कनकभूरुहवृंदें
कीं कृतार्थ म्हणती खगनाथा
कीं सुमें विलसऊं हरिमाथां ॥ ६३ ॥

भु. प्र. असो यापरी वाहुनी दिव्य नारी
वनीं पातला भूतला पन्नगारी
शुकें सूचविलें गरुत्मंत आला
मनीं माधवाचें महा हर्ष जाला ॥ ६४ ॥

उपजाति चहूंकडे देखत पाटपाणी
मध्यस्थ वेदीवरि चक्रपाणी
जो टेंकला चंपकभूरुहातें
तो वंदिला हो पतगें स्वहातें ॥ ६५ ॥

वंशस्थ सहर्षसव्रीडमनें मनोरमा
विलोकिती होय पुढें मनोरमा
दयानिधी भक्तसखा जगत्पती
उठोनि दावी महदादर स्थिती ॥ ६६ ॥

द्रु. वि. द्विभुजदेव चतुर्भुज जाहला
उचलुनी ललने दृढ भेटला
परम मोद तिच्या मनिं वाटला
युवतिकंठ सगद्गद दाटला ॥ ६७ ॥

मालिनी नयनघन तयेचे वर्षतां प्रेमवारी
पुशित वरिवरी तो जो जगत्प्राण शौरी
धरुनि हनुवटीतें सुंदरीवक्त्रपद्मीं
करुनि मधुपलीला चालिला सौधसद्मीं ॥ ६८ ॥

उपजाति श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
द्वितीय उल्लास समग्र जाला ॥ ६९ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये
मनोरमास्वागमनंनाम द्वितीयोल्लासः ॥ २ ॥

## तृतीयोल्लास

उपजाति श्रीगोपतीचा वररत्नसानू
क्रीडागिरी काय म्हणोनि वानूं
नगस्थ कल्पद्रुम कल्पवल्ली
जाईजुईही फुलल्या सुमल्ली ॥ १ ॥

व. ति. मंदार चंपक कदंबक पारिजातें
श्रीचंदनागरु सुरक्त पटीरजाते
पूगी नगीं सुफळ शोभत नारिकेळी
जंबू कपित्थ बदरी पनसाम्र केळी ॥ २ ॥

वंशस्थ स्वरत्नशृंगें घनमंडलावरी
न दाखवी पर्वत तो विभावरी
अखंडभानूज्ज्वल देश तो गमे
तटिल्लता-स्वर्णलतालि-संगमें ॥ ३ ॥

उपेंद्र. विचित्र धातू मणि जातरूपें
प्रवाहती निर्झर वोघरूपें
जवादि कस्तूरिमृगें सुवर्णी
सुगंध तैं धांवति कोण वर्णी ॥ ४ ॥

व. ति. गोपप्रतापतपनें नभसत्तटाकीं
ताराकळ्यांसह हसच्छशिपुंडरीकीं
सेऊं सुधारसमरंदभरें स्वलीलें
वाटे कलंकमधुपीं स्थिर वास केले ॥ ५ ॥

शा. वि. सौभाग्यास सरोवरें मिरवतीं त्या मानसाचे परी
रात्रींही कनकांबुजें विकसतीं श्रीकृष्णसत्तेकरी
कल्हारें कुमुदें सुगंध हरितें देताति मंदानिलें
झंकारें अलि वर्णिती यदुवरा कां तें असें भासलें ॥ ६ ॥

,, वापीचे तट चंद्रकांत झरती चंद्रांशु संपर्कतां
स्वच्छंदें रमती चकोरमिथुनें सच्चंद्रिका फांकतां
येतां मंद मनोरमेसह हरी लीलाक्रमें संभ्रमें
मार्गीं नाचति नीलकंठ सतटित्कालांबुवाहभ्रमें ॥ ७ ॥

व ति. दावीत यापरि विलास पथीं प्रियेला
सोपानपङ्क्ति हळु वेघुनिया स्वलीला
क्रीडाद्रिमौळिवरि यादवराज आला
देखोनि तें शयनमंदिर तुष्ट झाला ॥ ८ ॥

पंचचामर मनोज्ञ बाह्य वेदिका अलभ्य वासवादिकां
गृहाग्रकुंभकौतुका सहस्रभानु ये तुका
महीतळीं महाफणी तदीय मौळिचे मणी
निबद्ध त्या गृहांगणीं महत्त्व कोण तें गणी ॥ ९ ॥

शा. वि. भिंती आयत उन्नता विरचिल्या सत्पद्मरागाचिया
नीलस्तंभ पुढें सहस्र दिधले एकैक देशाश्रया
वज्रांचीं सदटें वरी तुळवटें वैडूर्य पद्मा महा
बारंगा किलच्या सुवर्णमणिच्या गोमेदिकांच्या पहा ॥ १० ॥

उपजाति प्रवाळबद्धा वसुधा तळींची
तो रंग वर्णूं न सके विरंची
नभस्थ तारापटलासमानें
मुक्ताफळांचीं दिसतीं विमानें ॥ ११ ॥

व. ति. माणिक्यदीपपुतळ्या रविरूपचित्रा
चंद्रास कीं उजळिती करबद्धसूत्रा
जालांतरें घुमघुमीत सुगंध धांवे
तो एक खेचरवरासच लाभ भावे ॥ १२ ॥

शा. वि. ऐसें श्रीहरिदर्शनीयशयनागार श्रियें आगळें
ब्रह्मेंद्रासहि चिंतनीय सहसा नोहे श्रमावेगळें
तें प्रत्यक्ष मनोरमेस विभुशीं क्रीडासुखा लाभलें
तस्माद्दैवदया जयावरि तया माहात्म्य येतें भलें ॥ १३ ॥

वंशस्थ अनंतरें त्या रमणीय मंदिरीं
मनोरमापाणि धरूनिया करीं
रवींदुदृक्देवमणी प्रवेशला
म्हणौनि तो सौध अति प्रकाशला ॥ १४ ॥

व. ति. दासी शतानुशत किंकर तेथिले जे
ते ते यथोक्त करिती उपचार वोजें
अन्योन्य बोलति हळू ललनामणी हे
कोठील कोण हरिचित्त हरीत आहे ॥ १५ ॥

शा. वि. कोण्ही वारिति चामरें हरिवरी कोण्ही फुलें टाकितीं
कोण्ही धांवति पीकपात्र धरुनी कोण्ही विडचा अर्पिती
कोण्ही देति सुगंधधूपशकलें कोण्ही लवंगादिकां
कोण्ही नाचति तालवृंत करिती कोण्ही पुढें कौतुका ॥ १६ ॥

शा. वि. कोण्ही सन्मुख बंदिसंघ पढती स्तोत्रें प्रबंधाकृती
कोण्ही ताळमृदंगमेळसह त्या वारांगना नाचती
कोण्ही सावध थोर शब्द करिती कोण्ही करालंबिती
ऐसा मध्य गृहांगणां यदुपती आला महेंद्रस्थिती ॥ १७ ॥

चारी खांब चहूंकडे पुतळिया स्वर्णोल्लसत्शृंखला
घंटामंजुळघोष कर्णयुगळां आनंद दे आगळा
पर्यंकोत्तम चारुमंटप महा शय्या फुलांची असा
डोल्हारा रुचला सूरत्नमय तो श्रीकांतसन्मानसा ॥ १८ ॥

मालिनी तंव यदुतिलकातें वृद्धवृद्धाप्तदासी
सविनय वदत्या त्या जाहल्या बुद्धिराशी
निरशन विभु तूंतें रुक्मिणीस्वामिनीनें
समजुनि तुजमागें धाडिलें ताट मानें ॥ १९ ॥

वंशस्थ अशी तयाची उचितोक्ति ऐकुनी
सुरत्नवेदीवरी त्या सुखासनीं
मनोरमेसीं जगदीश बैसला
दयानिधी तीसह सांग जेविला ॥ २० ॥

उपजाति उच्छिष्ट देवा न लभे जयाचें
तो तेंच सेवीत मनोरमेचें
म्हणों तिचें भाग्य अपार किंवा
हा दीनबंधू प्रकटी स्वभावा ॥ २१ ॥

" सुपक्व भक्षे विविधें विचित्रें
फळें रसाळें मधुपूर्णपात्रें
गोडी जयाची अमृतापहारी
पदार्थ ते सेवितसे मुरारी ॥ २२ ॥

उपजाति श्रीराजगोपाल रसज्ञ पाहा
प्रियेमुखीं ग्रास समर्पितो हा
तेही करी त्यापरि आदरातें
सौजन्यरीतीं स्तवि भीमकीतें ॥ २३ ॥

,, करुनिया भोजन याप्रकारें
भृत्यार्पिल्या साधुसुखोष्णनीरें
प्रक्षालुनी हस्तमुखांघ्रि वेगें
तो ऊठिला सप्रिय सानुरागें ॥ २४ ॥

व. ति. चिंतामणिप्रविलसत्पदपादुकांतें
लेऊनि टाकुनि तळीं मधुमत्तचित्तें
डोल्हारियावरि मुकुंद मनोरमेशीं
आरूढला स्मरभरें रतला विलासी ॥ २५ ॥

उपजाति डोल्हारियाची कल गुप्त होती
आरूढभारें सुख डोल येती
अपूर्व पाहा पुतळ्यास सूत्रें
अपाप देताती सुगंधपात्रें ॥ २६ ॥

मंदाक्रांता मर्यादेचे कुसुमपडदे भोंवते लांबवीले
दासीदास प्रचुरमतिचे सर्वही दूर जाले
तेव्हां बोले चतुरमुकुटोत्तंस शृंगारशाली
कांते तूझी रसिकरमणी ख्याति म्यां ऐकिजेली ॥ २७ ॥

उपजाति तूं सुंदरी सर्वकलाप्रवीणा
घेऊनी हातीं क्षणयेक वीणा
प्रभाव दावी निज भारतीचा
उत्साह कल्पी सखि या श्रुतीचा ॥ २८ ॥

उपजाति  अर्थांतरें उत्तर देत भामा
भा दीसते व्यक्त सुखाब्धिसोमा
रतिप्रसंगें करिजेल देवें
श्रुत्युत्सवानार्ह वधू स्वभावें      ॥ २९ ॥

,,  वाक्यें अशा सूज्ञकिरीटहीरा
कलावती नाम तुझें प्रचारा
येवो म्हणे येरि तुझीच सत्ता
जडाजडा चेतविते अनंता      ॥ ३० ॥

,,  त्यानंतरें घेउनि तेवि पंची
सप्तस्वरें गानकला प्रपंची
त्या आहरीनें हरिडोल आले
नगस्थ गंधर्व सलज्ज जाले      ॥ ३१ ॥

व. ति.  लागेल दृष्टि म्हणुनी मग यादवेंद्रें
ते वल्लकी करुनि दूरि विनोदसांद्रें
आलिंगिली दृढ उदार चतुर्भुजांनीं
आजन्म दुर्मिल हरीपरिरंभ मानी      ॥ ३२ ॥

आलिंगनीं उतटली निरसोनि चोळी
दे दृष्टि सादर उरीं रसिकेंद्रमौळी
देखूनि वर्तुळ कठोर उरोज भारी
हे काममोह-धनकुंभ म्हणे मुरारी      ॥ ३३ ॥

उपजाति  पुत्रार्जिता ते जनिताधिकारी
म्हणोनि घाली स्तनिं हात शौरी
नारी म्हणे रक्षक या निधीतें
हाराहि हा सावध साधि यातें      ॥ ३४ ॥

उपजाति हरी म्हणे मांत्रिक मी स्वलीलें
अहींद्रसेजें निजणार वाळे
बोलोनि ऐसें स्तन तेवि हारी
करूनि भोगी कमलाविहारी ॥ ३५ ॥

व. वि. आटोपितां तरुणिचे स्तनकुंभ हस्तें
साग्रें वरीं उमटलीं करजें समस्तें
बोले हरी तव उरीं मज आजि आली
रूपद्वयें शिव दिसे बहु चंद्रमौळी ॥ ३६ ॥

उपजाति शिवासि देखोनि न पूजि त्याला
घडेल कैसा शिवलाभ जाला
यालागि तूझ्या स्तनशंकरातें
अर्चूं म्हणे माधव सुंदरीतें ॥ ३७ ॥

वंशस्थ शिवत्व आवाहुनि भामिनीस्तनीं
हिमांत सौगंधरसाभिषेचुनी
जवादि कर्पूर पटीर केसरें
विलेपिला सद्रव यादवेश्वरें ॥ ३८ ॥

उपजाति मंदारजाजीवनमल्लिकांचे
समर्पिले हारहि चंपकांचे
बिल्वाकृती कल्पुनि मीनपत्रें
केली स्तुती हास्यरसोक्तिमंत्रें ॥ ३९ ॥

" रोमाळि धूपारतिधूमलेखे–
समान चित्तीं यदुराज देखे
नैवेद्य मानूनि सुखस्वरूपीं
गोविंद नीराजन कामदीपीं ॥ ४० ॥

उपजाति वीरायितीं मुक्तसुकेशपाशें
घडेल पुष्पांजलि सावकाशें
ऐसें मनीं भाउनि राजगोपें
केली रती कामकलाकलापें ॥ ४१ ॥

व. ति. हस्तैक योजुनि हनू धरुनी विनोदें
पाणिद्वयें कवळुनी स्तनयुग्म मोदें
चौथ्या शयें हरित तो हरि बद्धनीवी
ते सुंदरी करयुगें अबलत्व दावी ॥ ४२ ॥

इंद्रवज्रा नानासनें चुंबनभेदरीती
अन्योन्य आवेशभरें करीती
सीत्कार रोमोद्गम संभ्रमानें
दोघांस आले सुरतक्रमानें ॥ ४३ ॥

उपजाति परस्परें ते अधरामृतातें
सेऊनि देती अनिमेष ते तें
सस्वेदवक्त्रें वसनांचलानें
पुसोनि आलोकिति संभ्रमानें ॥ ४४ ॥

द्रु वि. क्रमरत श्रमवंत यदूत्तमा
निरखुनी रमणीमणिनें श्रमा
परिहरूं विजना-वसनांचलें
त्वरित सत्पवनाप्रति आणिलें ॥ ४५ ॥

स्वागता स्पर्शतां सरस मंद समीरें
मानिलें सुख बहू यदुवीरें
श्लाघिलें सुवचनें ललनेतें
अर्थ तो श्रवण हो चतुरातें ॥ ४६ ॥

शा. वि. कस्तूरी-घनसार-केसर-मिलत्पाटीर-सार-द्रवें
सांद्रालेपित शातकुंभकलशा धिक्कारिते गौरवें
ते तूझे स्तन मस्तकीं धरिति ज्या सेवी जगत्प्राण हा
तो चेलांचलिं योजिला तरुणि तां मत्प्राणसेवे पहा ॥ ४७ ॥

व. ति. बोले असे परवधूहरमौळिहीरा
ते बोलिली मदनसंगररंगधीरा
हा आजि युक्त हरि तां पुरुषार्थ केला
मी स्त्री परंतु निरखी पुरुषायिताला ॥ ४८ ॥

शा. वि. ऐसें बोलत बोलतां अवचितें त्या धूर्तधौरेयका
आणूनी तनु लाघवें तळवटीं होऊनि मुक्तांशुका
निष्कोशामदनासिशीं झळकुनी कामद्रवाच्या मिसें
पाडी झांपडि लोचनां हरि मनीं आनंदला सौरसें ॥ ४९ ॥

भु. प्र. चलन्मेखला-किंकिणी-मंजुघोषें
क्वणत्कंकणें नूपुराराव तोषे
म्हणे कृष्ण मी धन्य मूर्धन्य जालों
प्रिये त्वद्रतें आजि संपूर्ण धालों ॥ ५० ॥

व. ति. सोळा सहस्रवरि अष्ट वरिष्ट कांता
या वेगळचा पुर-विलासवधू अनंता
कामाकृती अनुभवी रति सृष्टिधाता
तो राजगोप चढला तुझियाचि हातां ॥ ५१ ॥

उपजाति मनोरमे कामकलाप्रवीणे
कौसल्य तूझें मम चित्त जाणें
वदों किती जन्म कृतार्थ केले
अनंग-साम्राज्यहि सांग जालें ॥ ५२ ॥

शा. वि. या बोलें नटली सपर्वतलता ज्योत्स्ना तमें ग्रासिली
नक्षत्रच्युति जाहली नगयुगीं सूर्येंदुनें देखिली
पद्मीं मौक्तिकमंडली उपजलीं इंदीवरीं ध्यायिली
शंखें आपण गायिली हरिकथा ऐशी निशा लोटली ॥ ५३ ॥

तों गांधर्वमुखें प्रभात कळतां शौरी म्हणे भामिनी
पाहे तूज न पूसतां निजपदा जाते सखी यामिनी
ईतें नाठवितां सुखें मजसवें तां क्रीडतां रूसली
आतां ईस उपेक्षितां तव वरा बोधील नोहे भली ॥ ५४ ॥

भु. प्र. प्रिये या निमित्तें खगारूढ होई
गृहा आपुल्याई पुढें सीघ्र जाई
असे बोलतां गोप चातुर्यखाणी
मनीं तुष्टली कष्टली कीरवाणी ॥ ५५ ॥

उपजाति ते बोलिली संतत पाय तूझे
सेवावया तादृश योग माझे
समर्थ होतील कसे स्वलीला
भाग्योदयें हा क्षणलाभ जाला ॥ ५६ ॥

इंद्रवज्रा आतां असो पूर्ण कृपा कृपाळा
श्रीराजगोपा सुरलोकपाळा
मी बंभरी त्वत्पदसारसाची
हे औपचारोक्ति नव्हेच साची ॥ ५७ ॥

शा. वि. ये रीती अनुवादतां उभयतां कल्पांत त्यां वाटले
प्रेमें कंठहि दाटले न धरतां नेत्रांबुधी लोटले
गाढालिंगनचुंबनीं झगटले ते देह दोन्ही भले
संयोगींच वियोग निर्गतपणें योग्यापरी शोभले ॥ ५८ ॥

व. ति. श्रीकृष्ण-लोकगुरुचा दृढ योग जाला
तेणें तिच्या हृदयिं उद्धव सिद्ध ठेला
आलिंगनाहुनि शरीर तिचें निराळें
जालें परी गवसिलें न वियोगजालें ॥ ५९ ॥

इंद्रवज्रा बाला विलोकीत पदार्थसृष्टी
तों जाहली पूर्व अपूर्व दृष्टी
अंतर्बहिः कृष्ण जगन्निवासें
दिल्हें तिला दर्शन चिद्विलासें ॥ ६० ॥

शा. वि. जागृत्स्वप्नसुषुप्ति या उठुनिया वेधूनि तुर्या महा–
प्रासादांतरिं उन्मनीसखिसवें निःशब्द बोले पहा
सांगे सद्गुरुकांत गूज निज तें चोजासही चोज ये
ब्रह्मानंदविलास तो अनुभवी जो देशिकांचे दयें ॥ ६१ ॥

उपजाति अरीस नारीस भयाभयानें
सायुज्य देणार उदारतेनें
गाथाहरी श्रीहरिचे प्रसंगें
म्यां देखिली सत्य निजांतरंगें ॥ ६२ ॥

निद्राभरी पूर्विल चावळेसें
नेसोनिया स्वांबर मंद हांसे
पीतांबरेसीं ललना निघाली
विशुद्ध ते वंदुनि सेज आली ॥ ६३ ॥

इंद्रवज्रा श्रीराजगोपाल मनोरमेसीं
बाहेर येतां परम त्वरेंसी
तो वंदितां मुख्य उपासकांनीं
भाग्योदयीं मी सुखसूर्य वानीं ॥ ६४ ॥

शा. वि. माथां मंदिल चोपला वरि तुरा कांहीं असे चोळला
कंठीं हार विगुंतला परिमळें आलेप आंगाथिला
तो पीतांबर राखिला कटिगुणें देह श्रमें सेविला
ऐसा कामुक राजगोप सुकृतें कांतांतरीं राहिला ॥ ६५ ॥

भु. प्र. पदीं लेयिला पादुका रत्नखाणी
तटिद्वर्ण सौवर्ण वेत्रैकपाणी
म्हणे गोप पक्षीश्वरा रम्यवाणी
सख्या हे यथापूर्व ने नीलवेणी ॥ ६६ ॥

ममारातिचा हा गुरू हो परंतू
कवी सूचवीतो हिताचाच हेतू
जगच्चक्षु मार्गीं न पाहे असें हे
त्वरें पाठवावी असें बोधिताहे ॥ ६७ ॥

अरीही विवेकी असो सन्निधानीं
नसो मूर्ख तो आप्त कोण्ही विधानीं
म्हणोनी अगा ऐक वाताशनारी
स्थळा पूर्विल्या पाववी शीघ्र नारी ॥ ६८ ॥

वंशस्थ करूनि माथां हरिबोध तो तुरा
धरूनि खांदां ललना मनोहरा
निजाग्रजा शंकितसा खगोत्तमें
यथास्थलीं स्थापयिली क्षणक्रमें ॥ ६९ ॥

व. ति. हर्म्यांगणीं उतरुनी रमणीमणीतें
येतो म्हणूनि पुसतां गरुडें सुचित्तें
ते बोलिली अमृतसार मनोभिरामा
साष्टांग वंदन कथी यदुसार्वभौमा ॥ ७० ॥

उपजाति खगोत्तमा पूर्ण कृपा असों दे
तुझ्या कृतीनें हरि नित्य मोदे
माझी करी आठवण प्रसंगें
शुकास ऐसें विनतीस सांगे ॥ ७१ ॥

,, दीनोक्ति त्या दीनदयासमुद्रें
ऐकोनि आश्वासुनि ते खगेंद्रें
केलें पुन्हां स्वागमन त्वरेनें
प्रभात भासे अरुणोदयानें ॥ ७२ ॥

,, श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
तृतीय उल्लास विशेष जाला ॥ ७३ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये मनोरमास्वभवन-
प्रवेशोनाम तृतीयोल्लासः ॥ ३ ॥

# चतुर्थोल्लास

इंद्रवज्रा श्रीराजगोपाल विलासशाली
देखोनि नागांतक नम्रमौळी
बद्धाञ्जली स्वामिपदानुलक्षी
त्या बोलिला कृष्णकरस्थ पक्षी ॥ १ ॥

शा. वि. एतां नूतन देशपालक पुढें ये आप्त त्याचा जसा
बांधी पल्लव तोरणें पहिलिल्यां आकांत मांडी तसा
होतां सूर्य तदोदयस्थ किरणें आकाश शृंगारिला
राजश्री हरुनी चकोरनिकरां कल्पांत उत्पादिला ॥ २ ॥

रथोद्धता सर्व तत्कुवलयास बांधिलें
तारकाद्युतिस फार रोधिलें
स्वीय बंधु कमलौघ सोडिला
साधुचक्रशिणपाश तोडिला ॥ ३ ॥

मालिनी कमलमधुपबंदी वानिती वैनतेया
द्विजसकळरवाशीर्वाद देती पहा या
पवन उपवनाचे येति शैत्योपहारें
विभव कवण मानी साच हें सद्विचारें ॥ ४ ॥

उपजाति भला भला त्या प्रभु बोलियेला
तों येक अंतःपुरचार आला
तेणें अहो कर्णजपास केलें
श्रीचंपकेशा बहु हास्य आलें ॥ ५ ॥

,, सभोंवत्यां गोपकटाक्षलीलें
समीपिचे सेवक दूर जाले
त्यां बोलिला माधव त्या प्रसंगा
कदापि कोण्ही पुशिल्या न सांगा ॥ ६ ॥

,, कर्णांतविश्रांतविलोचनानें
करूनि संकेत तदा दरानें
शौरी म्हणे पन्नगसूदनाला
प्रसंग मोटा दिसतो उदेला ॥ ७ ॥

,, हे कालि सत्राजितनंदिनीची
विलंघिली म्यां रति निश्चयाची
श्रीरुक्मिणीवीण तिनें स्वबोलें
समग्र अंतःपुर आप्त केलें ॥ ८ ॥

भु. प्र. कशी यावरी प्रीति साधेल तीची
न चालेच वित्पत्प माझ्या मतीची
असें बोलतां त्या महाधूर्त धीरें
दिल्हें उत्तरें प्रौढ धीमंत कीरें ॥ ९ ॥

इंद्रवज्रा देवा असो स्वस्थचि चित्त तूझें
संधानचातुर्य विलोकि माझें
जातां पुढें मी करितों विचित्रें
ते भेदितों सर्व तुझीं कलत्रें ॥ १० ॥

शा. वि  आरोढूनि खगेश्वरीं उतर तूं सिंधुगृहीं श्रांतसा
धाडी तेथुनि हा सुपर्ण सुचऊं मातें वधूलालसा
ऐसें बोलुनि चालिला उतरला तो कीर अंत:पुरीं
त्यातें एकट देखतांच ललना त्या शंकल्या अंतरीं ॥ ११ ॥

भु. प्र.  कधीं हा हरीच्या वियोगार्ह नोहे
असा आजि कां एकला पातलाहे
दिसे म्लानही नेणवें वृत्त याचें
असें पावलें चित्त चांचल्य त्यांचें ॥ १२ ॥

स्रग्धरा  भामा प्रासादगर्भीं हरिवरि रुसल्या सर्व सत्याभिमानें
तेणें कोण्ही शुकाशीं न वदति दयिता गोपतीच्यावमानें
तेव्हां न्यायानुसारी विधिसम वदला कीर एक्या मुखाचा
ऐका हो सुंदरी हो सकलहि जन हा भाग्यभोक्ता सुखाचा ॥ १३ ॥

शा. वि.  लोकीं मित्र कलत्र पुत्र अवघे संपत्सखे निश्चयें
ऐसें म्यां बहुतांमुखें परिशिलें तें देखिलें प्रत्ययें
जो प्राणेश्वर तूमचा सुखनिधी तो आजि कोठें हरी
हें मातें न पुसा पुढें करितसा गांधर्ववोडांबरी ॥ १४ ॥

उपजाति  घडीभरी विश्वविलासकंदें
केलें नसे दूरि मला मुकुंदें
क्रीडेंतही सन्निध पिंजरां मी
असें तुम्ही देखियलें स्वधामीं ॥ १५ ॥

व. ति.  मातें अशा त्यजुनि एकट राहि जैसा
कैसा असेल समय त्रिजगन्निवासा
ऐसा विवेक कवणासहि आठवेना
जे ते उगीच रुसली दिसते वदेना ॥ १६ ॥

भु. प्र. असो मुख्य यांमाजि जे सत्यभामा
धरी आजि तेही अपूर्व स्वनामा
प्रधानत्व तीचें करी मित्रबृंदा
भजे ते कसी एक मित्रा मुकुंदा ॥ १७ ॥

उपजाति पदास यानंतर रुक्मिणीचे
जाऊनि पाहूं बहु सौध तीचे
करूं तयानंतर शोध तैसा
कल्याण तो होय द्विजावतंसा ॥ १८ ॥

,, बोलोनि ऐशी छलपूर्ण वाणी
वाणीसि आणूनि रथांगपाणी
उडेलसी दावित कीर लीलें
उद्भाव तों जांबवतीस आले ॥ १९ ॥

वंशस्थ उठोनि वेगें रमणीशिरोमणी
धरूनि तो वामकरांबुजें गुणी
म्हणे अगा मत्प्रिय पाणि-भूषणा
किमर्थ तूं एकट सांग साजणा ॥ २० ॥

,, जळो जळो हा अभिमान आमुचा
पतिव्रते नाहिं अमार्ग हानिचा
पती गुरू देव सतीस निश्चयें
कळोनि ऐसें हृदयें अचिन्मयें ॥ २१ ॥

शा. वि. ऋक्षाध्यक्षसुता असें वदत तों नीला म्हणे लक्षणें
भामेनें कथिलें खपुष्पसम तें या कीरवाक्येंगुणें
भासे आणिक हा प्रसंग सहसा श्रीरंग कोठें असा
कीजे शोध-उपाय या शुकमुखें आणोनिया मानसा ॥ २२ ॥

शिखरिणी वदे भद्रा भद्रा मति सकलिकांची समजली
वृथा सत्योक्तीनें रमणचरणीं प्रीति खिजली
तये ते कालिंदीप्रति वदलि बाई चपलता
विवेकातें हर्ती म्हणुनि कथिलें म्यां प्रथमता ॥ २३ ॥

इंद्रवज्रा ते बोलिली त्यावरि मित्रबृंदा
सर्वत्र पात्रें प्रमदा प्रमादा
त्यामाजि भामा सहवासदोषें
पूर्वींच कीरें स्तविलें विशेषें ॥ २४ ॥

रथोद्धता या जनीं न मिळतां महा भली
रुक्मिणी परम कीर्ति लाभली
जांबवंतदुहिता हितावहा
दाविते प्रिय शुका स्वभाव हा ॥ २५ ॥

स्वागता यापरी मुखरिणी गणभेदें
उत्तमा अखिल हा अति खेदें
भेदिल्या निरखुनी शुक लीलें
ऋक्षराजतनयेप्रति बोले ॥ २६ ॥

शा. वि. देवी ऐक महाद्भुत प्रगटलें नाहीं कधीं देखिलें
पूर्वाण्हीं मृगयेस जात असतां देवें विलासाकुलें
देवेंद्रानुज यादवेंद्र म्हणुनी आकाशकायासुरें
दायादत्व गणोनि फार दलिलें श्रीधाम पत्रीं बरें ॥ २७ ॥

इंद्रवज्रा अदृश्य येऊनि अतर्क्य रीतीं
तो साधितां होय महा अराती
भेदूनि वर्मीं प्रभु आर्त केला
तेणें प्रतीकार तयानुजाला ॥ २८ ॥

मालिनी हरहर हरिचा तो खेद मी काय वानूं
बहु रिपुबल वधें पावतां अस्त भानू
म्हणउनि परतूनी मंदिरा देव आला
निवसुनि विजनीं ते तज्जयीं यत्न केला ॥ २९ ॥

शा. वि. तों तेणें जनमोहनें अतनुनें कीं अस्तमस्तावरी
तेजोराजि उपासिला प्रगटिला दुस्ताप कृष्णांतरीं
संध्या घोर निशाचरीं तदुचिता दीप्त प्रतापारुणा
श्यामा सेउनि वारुणी खवळली उत्तारका दारुणा ॥ ३० ॥

भु. प्र. तमःपुंज तत्सैन्य वेढीत आलें
मधुप्राशकी माधवा तर्जियेलें
तया ध्वंसिलें रुक्मजातें सुगंधें
सुखी रक्षिलें रुक्मिणी सानुबंधें ॥ ३१ ॥

उपजाति त्यांचें करूं साह्य सराग जाला
तो रौद्र दोषाकरराज आला
ज्योत्स्नाज्ज्वलत्कांतिधर द्युसद्मा
सतारक द्योतवि सूरपद्मा ॥ ३२ ॥

व. ति. तेणें तदा कुवलयोज्ज्वलबाणजालें
केलें प्रविद्ध हरिच्या हृदया करालें
त्याहीवरी विरहभासुरपावकास्त्रें
संत्रासिला प्रभु धरूं सकला न शस्त्रें ॥ ३३ ॥

,, तें देखिलें द्विजकुळेंद्रशुकें प्रसंगें
आश्वासिलें यदुवरा मग लागवेगें
केला प्रवेश अति सत्वर इंद्रधामीं
तें तोच जाणत कदा न वदे सुधा मी ॥ ३४ ॥

मालिनी तदुपरि खगयानें इंद्रशक्ति प्रचंडा
उतरुनि वसुधेतें पातली चंद्रतुंडा
कवळुनि दृढ तीनें त्या उपेंद्रत्व भावें
पिवउनि अमृतातें रक्षिला देव दैवें ३५ ॥

उपजाति त्यानतर दुर्गमशलदुर्गा
आटोपुनी ते जयपूर्वदुर्गा
प्रवर्तली सांगअनंगयुद्धा
तद्वर्णनीं होय गिरा निरुद्धा ॥ ३६ ॥

पृथ्वी अवाङ्मनसगोचरें प्रचुरसंगरश्रीभरें
अकाय जय साधुनी हरिस देउनी आदरें
सवेग खगवाहना स्वपद पावल्यानंतरी
प्रभूस शुक बोलिला निवस सिंधुसद्मांतरीं ॥ ३७

व. ति. योगींद्र हा शुक असें वदतो रसानें
येथूनि सिंधुसदना निघतां त्वरेनें
अंतःपुरस्थिति विचारुनि ये स्वचित्तें
ऐसें म्हणोनि मज पाठविलें अनंतें ३८ ॥

शा. वि. तों पूर्वाचलसिंहपार्श्वशिखरभ्राजन्(द्)रवी दुर्घटा
उद्भेदूनि सलीलनीलजलदव्यूहद्विपांच्या घटा
मूर्धास्यें अरुणामिषा कवलुनी कांकीं वमो लागला
तारामौक्तिकसंघ तो विखरला संध्याति रक्ताविला ॥ ३९ ॥

,, भामा कालि असेल फार रुसली पाळी न पाळी हरी
ऐसें मानिल मानिनी म्हणउनि येथेंच आगोधरी
आला तों अवघ्या तुम्ही अघटिता आश्चर्यसें या घरीं
भाग्यें म्यां अवलोकिल्यात कथिला वृत्तांत कल्पोत्तरीं ॥४०॥

शालिनी ऐसी सार्था ऐकतां कीरवाणी
सत्याचित्तीं सद्रव प्रेमखाणी
जाली आली धांव घालूनि हातें
स्पर्शोनीया लालियेलें शुकातें ॥ ४१ ॥

भु. प्र. म्हणे सत्यभामा सख्या भाव तूझा
भला देखिला केउता स्वामि माझा
जगीं सात आहेति सिंधू परंतू
कसा शोधिजे कोण तो सांग हेतू ॥ ४२ ॥

व. ति. चिंता अशी प्रबळतां अवरोधरामा
चारीं विचार कथिला वलसिंधुरामा
तो रेवतीपति विशेष सरोष जाला
स्वांतःपुर क्रमुनि राजसभे निघाला ॥ ४३ ॥

उपजाति श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
चतुर्थ उल्लास अशेष जाला ॥ ४४ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये राजगोपालां-
तःपुरप्रविष्टशुकदूतंनाम चतुर्थोल्लासः ॥ ४ ॥

# पंचमोल्लास

शा. वि. श्रीकृष्णाग्रज राम भीमसम जो क्रोधें सभें पातला
होते जे अवरोधरक्षकबळी तेंहीं प्रभू वंदिला
त्यांतें दंडुनि दंडपाणि निकरें अत्यंत संतापला
कैसें सावध रे तुम्ही जड असा नीचोत्तरीं बोलिला ॥ १ ॥

" सांगा सात्यकिसीं स्वसैनिकवरां आणीक त्या यादवां
सेना सज्जुनि आणवा निवटणें निःशेष या दानवां
ऐसें ऐकुनि राजशासन-महावेत्री त्वरें धांवले
आर्भाटें करितां निदेश रथिकां लोकांत त्या भावले ॥ २ ॥

मालिनी रथगजहयथाटी कोटिच्या कोटि येती
अगणित हरिसेना पद्मसंख्ये पदाती
निजनिज दळभारें वाहिनीनाथ आले
पुरजन म्हणती कीं सिंधु उद्वेल जाले ॥ ३ ॥

भु. प्र. रथारूढला सात्यकी वीर राजा
सवें चालिल्या त्या असंख्यात फौजा
बळी-कृष्णसत्पुत्रपौत्रैक-थाटीं
मिळाले यदूत्तंस छपन्न कोटी ॥ ४ ॥

उपजाति चहूंकडे वाजति भीम वाद्यें
बंदीमुखें श्लाघिति कीर्तिगद्यें
ऐसा सभाद्वारमुखप्रदेशीं
आला मुकुंदानुज यादवेंसीं ॥ ५ ॥

शा. वि. तों यानाहुनि सात्यकी न उतरो ऐसेंच आज्ञापुनी
द्वात्रिंशत्प्रबळाश्व योजित महातालध्वजस्यंदनीं
वेघोनी बळभद्र रुद्र दुसरा कल्पांतिचा भासला
खांदां वाहुनिया हलास मुसला तोलूनिया गर्जला

मालिनी प्रळयघननिनादें गर्जतां भद्रदेवें
प्रवळ रणतुरे ते वाजली तत्प्रभावें
पणव पटह भेरी काहळा शंख घोषे
अमर निकर पाहूं पातले अस्ततोषें ॥ ७ ॥

व ति. जाणोनिया प्रभुमनोदय कोपलीला
सूतें शतांग अति सत्वर चालवीला
त्या सात्यकीप्रभृति यादवसैनिकांनीं
केला प्रणाम बलरामपदां दुरूनी ॥ ८ ॥

उपजाति हली म्हणे रे सुमतिप्रधाना
पूर्वेकडे चालवि सर्व सेना
क्रमेंच हे शोषुनि सप्तसिंधू
शोधीन माझा अनुजात बंधू ॥ ९ ॥

इंद्रवज्रा जो सांग देवांतक मस्त हस्ती
संहारितां सिंह रथांगहस्ती
तो रे अनंगासुरजंबुकानें
संत्रासिला आयिकिला स्वकानें ॥ १० ॥

व.ति. तेणें म्हणे जलधिसेवक कृष्ण जाला
हो हो समुद्र जडधी न मनूनि त्याला
नाहीं कसें अझुणिही मज भेटवीलें
कीं त्या मदीय भुजसत्व न वेद्य जालें ॥ ११ ॥

या कारणें प्रथम शोषुनि सागराला
कृष्णावनोपकृतिफेड करूं स्वलीला
ध्वस्तासुरप्रणयिनीनयनांबुपूरें
तो मागुती भरिन आजि यथाप्रकारें ॥ १२ ॥

उपजाति बोलोनि ऐसें सचिवास मानें
स्वसारथ्या राम म्हणे त्वरेनें
सेनेपुढें चालवि रे रथातें
रोधूं नको भीमचमूपथातें ॥ १३ ॥

इंद्रवज्रा आज्ञेस त्या वोडउनि स्वमाथां
पाहोनिया नांगर पूर्वपंथा
बत्तीसही वाहलगाम हातें
सेंदूनि तो साट दिल्हा तयांतें ॥ १४ ॥

व. ति. साटध्वनी परिसुनी पवनांग होती
भूस्पर्श संशय करीत तुरंग जाती
येती उफाळत समान चमू द्विभागें
जाले तया रथिकराज समग्र मागें ॥ १५ ॥

भु. प्र. महावीर मी-तूं म्हणूनी निघाले
पुरद्वारदेशीं दळे रुद्ध जाले
रथानें रथा वारणें वारणासीं
हयानें हया लोटती वीर्यराशी ॥ १६ ॥

भु. प्र. त्वरें तो रणा लंघितां सीरपाणी
रिघे वाहिनी गोपुरीं भू दणाणी
प्रभूच्या महाशासनें दंडधारी
तया शासितां जाहला घोष भारी ॥१७॥

इंद्रवज्रा तेही असें येउनि बाह्यदेशा
आटोपिलें सत्वर रेवतीशा
तो साश्वकोटीश्वर पार्श्वभागें
संग्रामशूरें नमिलें सवेगें ॥१८॥

स्वागता अच्युताग्रज म्हणे रसिकेंद्रा
जागरश्रम दिसे बलसांद्रा
जा गृहास अथवा सह येई
बोलिला रसिक उत्तर देईं ॥१९॥

उपजाति अवश्य येतो म्हणुनी सुबोलें
प्रत्याहुनी सत्वर कामपाळें
आज्ञा करूनी सुमतिप्रधाना
विभागिली यापरि राजसेना ॥२०॥

संग्रामशूरें मम वामभागीं
यावें तुवां सात्यकि दक्षिणांगीं
प्रद्युम्न हो अग्रत पृष्ठदेशीं
उषापती यो निज वाहिनीशीं ॥२१॥

यावेगळा राजकुमारपाळा
घेऊनि संगें निजसैन्यमेळा
यथारुची नाग रथें तुरंगे
चालो समीपींच पुढें सवेगें ॥२२॥

शा. वि. कृष्णानीक असें विभागुनि चहूंभागीं चतुःसैनिकें
मध्यें स्वीय चमूसमेत सुरथीं जातां त्वरां कौतुकें
सेनेच्या पदरेणुकैतवतमें व्योमीं रवी ग्रासिला
तों नीलांबर देखुनी स्ववसनीं वाटे मनीं शंकला ।२३॥

इंद्रवज्रा जाती मदें दुर्धर भद्रजाती
धाकें महा ग्रावहि पीठ होती
वीजा जशा त्या नवमेवसंघीं
तैशा पताका गमती गजौघीं ॥२४॥

उपजाति न योजितां लक्ष्य न ठाकतांही
न राहवीतां गतिवेग कांहीं
कराग्नियंत्रें बहु ते पदाती
ां भूवरि पाडिताती ॥२५॥

मालिनी हयखुर-खुरप्यांनीं भूतृणा खंडियेलें
तदनुग रथचक्रोद्घर्षणें चूर्ण केलें
सुररिपु खगरूपें बोलिले भीतभावें
हलधर-रणरंगीं काय दांतीं धरावें ॥२६॥

व. ति. त्यानंतरें शिखर देखुनि
संतोषलें मन तया यदुशेखराचें
संकर्षणें नमुनि इंद्रसमर्चिता त्या
त्यागेश्वरा नवशिलें प्रणतेष्टदात्या ॥२७॥

इंद्रवज्रा श्रीकृष्णसंदर्शन आजि होतां
अर्चीन रत्नीं परतोनि येतां
ऐसें म्हणोनी मग कामपाळें
प्रदक्षिणेनें दळ चालवीलें ॥ २८ ॥

व. ति. पद्मालयाहुनि पुढें स्फुट योजनांतीं
दूरूनि तो निरखिला सळणार चित्तीं
उल्लोल टाकित महाद्रिपरी धडाडा
क्रोधें हलायुध रदां रगडी कडाडा ॥ २९ ॥

शा. वि. उत्पातीं गिरिकंदरा वसुधरा पृथ्वी सकंपा जसी
रामें सागरमूर्ति चंचलतरा आलोकिली ते तसी
अंतर्लीन सुमौक्तिकोडुपटलें कल्लोल गर्जद्घनें
वर्षाकाळसमांबुधी निरखिला त्या वाहिनीलोचनें ॥ ३० ॥

,, ऐसा देखुनि वाहिनीपति पुढें कोपूनि नामच्छळें
चौघेही हरिवाहिनीपतिबळें लोटूनि आलें दळें
तेणें दुर्धर कुंभिनीभवरजःपुंज प्रवर्धें महा
मानी सागर कुंभजात मजला शोषील दुर्वार हा ॥३१॥

,, तैं नेमीं रथकिंकिणीनिनद जो सेनोदरीं जन्मला
तों नृत्यत्तुरगांघ्रिनूपुररवद्घोषाभरें माजला
त्यातें सिंधुरबृंहितोद्भटरवा घंटाध्वनी भेटला
तेणें सिंधु धडाडिला बहु गमे धाकोनि आक्रोशला ॥३२॥

व. ति. सेनामुखीं मदन तो अतिक्रुद्धचित्तें
मीनांकता धरित सागर या निमित्तें
आकर्ण वोढुनि शरासन एक काळें
केला जलप्रलय पावक बाणजाळें ॥३३॥

इंद्रवज्रा तैसीच सर्वीं शरवृष्टि केली
धूम्रें दिशा-वोळखि लोपवीली
पत्रीं समुद्रीं भरतां धुधाटें
संव्हारिती ते जलजंतुथाटें ॥ ३४ ॥

भु. प्र. महामत्स्य ते ध्वस्तपुच्छ क्षणातें
करूनी म्हणे काम मीनाकरातें
अरे तुच्छ तूं छेदिले केतु तूझे
पहा मागुती बाण हे स्वच्छ माझे ॥ ३५ ॥

इंद्रवज्रा तों सात्यकी सायक वर्षला हो
संग्रामशूरा न पुरेच लाहो
बाणीं समुद्रा अनिरुद्ध रोधी
जो तो म्हणे घ्या हरिच्या विरोधी ॥ ३६ ॥

भु. प्र. महासर्प ते योजनप्राय देही
तिलप्राय झाले बृहन्नक्र तेही
प्ररंध्राथिल्या कर्कशा कूर्मपृष्ठी
तरी न स्थिरे यादवीं बाणवृष्टी ॥ ३७ ॥

" असा मारितां मार मारादिकांनीं
बहू जाहली सागरीं तोयहानी
अजी शोषिला योजनें साटि सिंधू
हटा पेटला नावरे कृष्णबंधू ॥ ३८ ॥

उपजाति जालें अहो अद्भुत ते प्रसंगीं
विलोकिलें दैत्य जलांतरंगीं
विचित्र तें कर्म पहा मयाचें
अंतर्जलींही पुर दानवांचें ॥ ३९ ॥

इंद्रवज्रा निःशेष होतां उदक प्रकाशें
तें देखिलें पट्टण सावकाशें
प्राकार तो रत्नमय प्रभासे
रत्नाकराचा मणिकोश भासे ॥ ४० ॥

उपजाति विचित्रसेन प्रभु त्या पुरीचा
दैत्येश्वर प्रौढ महाबळाचा
त्या सिंधुशोषें अति रोष आला
सन्नद्ध तेणें दळभार केला ॥ ४१ ॥

,, देऊनिया सानुज चित्रसेना
ते धाडिली धाडि सुरारिसेना
केला महामारहि वन्हियंत्रें
कडाडिलें अंबर एकसूत्रें ॥ ४२ ॥

भु. प्र. दशघ्नी शतघ्नी सहस्रें सहस्रा
क्षणें सूटतां दाट धूम्रें तमिस्रा–
दशा वर्तली तन्निमित्तें दिसेना
गणी विक्रमार्कास्त ते कृष्णसेना ॥ ४३ ॥

उपजाति प्रचंड कालायसपिंड येती
उदंडसें यादवसैन्य नेती
यदुप्रवीरां न दिसेच कांहीं
धूम्रें दिशा वेढिलिया दहाही ॥ ४४ ॥

,, धूमच्छलें तें तम फार आलें
निशाचराचें बहु साह्य जालें
जों राम-चंद्रोदय तो न जाला ·
तों क्लेश दाशार्ह-चकोरजाला ॥ ४५ ॥

भु. प्र. तुरंगीं रथीं कुंजरीं वीर मोटे
रणीं दानवीं लाविले मृत्युवाटें
किती भक्षिले शिक्षिले क्षारनीरें
हहाकारिले यादवांनीं कसा रे ॥ ४६ ॥

उपजाति सुरारिजेताबळनाशनाला
आकाशकायासुर काय आला
अदृश्य त्याचे भट संहरीती
अम्हां दिसेना परि घाय होती ॥ ४७ ॥

स्रग्धरा कोठें कीं सात्यकी तो स्मरसहसुत रे युद्ध योद्धा दिसेना
ऐशी सेना म्हणे तों अवचट मदनें देखिलें चित्रसेना
कंठीं घालूनि चाप प्रबळतर गदा वोपिली मौळिभागीं
मूर्च्छाक्रांत क्षणार्धं त्रिदशरिपु महीं सूदला युद्धरंगीं ॥ ४८ ॥

व. ति. सेनापती हत म्हणोनि सुरारिसेना
वित्रासतां हरिकुमार समार नाना
शस्त्रास्त्रवर्ष करुनी जयवंत जाले
ते निर्जरारि मृतशेष पळों निघाले ॥ ४९ ॥

पृथ्वी सुरेंद्र नवलावला गुरुमुखें स्मर श्लाघला
सुपुष्पघन वर्षला विजयदुदुंभी गर्जला
असा समय वर्तला बहुत राम संतोषला
सुतानिकट पातला सदृश कर्मसें बोलिला ॥ ५० ॥

भु. प्र. चमूनाथ हा मन्मथें भग्न केला
किती संघ त्याचा निमाला पळाला
पुढें युद्धकर्ता नसे दुर्ग वेढा
असें बोलिला राम वीरेंद्र गाढा ॥ ५१ ॥

शा. वि. सेनानायक सात्यकी सकळिकां सांगे तसें तों महा
मूर्च्छा सावरुनी अतर्क्य गतिनें वैरी उडाला पहा
व्योमीं सेनच चित्रसेन गमला वार्ष्णेयपक्षीकुळा
मायावी यमदंडचंडपरिघें दावी तयां दोर्बळा ॥ ५२ ॥

मालिनी भंवडुनि परिघातें दानवें घोरघातें
हरिसुत अति मूर्च्छाक्रांत केलें क्षणातें
हटकुनि दलिलें त्या भीमसंग्रामशूरा
रथविरहित केले वीरविख्यात मारा ॥ ५३ ॥

उपजाति तों सात्यकी दुर्धर वीर्यशाली
संमूर्च्छना त्यासहि आणिजेली
स्फुटाट्टहासें मग सीरपाणी
हाकाटिला कर्कश नीचवाणीं ॥ ५४ ॥

इंद्रवज्रा हालायुधा नांगरुनी क्षितीतें
द्यावें स्वभागार्जुनि भूपहातें
त्या तां कसें आजि सधैर्य वोजें
या चित्रसेनासह युद्ध कीजे ॥ ५५ ॥

उपजाति विचित्रसेनप्रभुच्या कृपेनें
जा सोडितो पोट भरी कृषीनें
बोलोनि ऐसें गगनीं रहात्या
संकर्षणें हांसुनि लक्षिलें त्या ॥ ५६ ॥

" यथार्थ तें वाक्य तुझें करावें
म्यां आजि युद्धस्थल नांगरावें
कैलास(सिं)तूझें शिर पाठवावें
विचित्रसेनास विचित्र व्हावें ॥ ५७ ॥

" वदोनि ऐसें बळरामदेवें
विस्फारिलें सज्जधनुः स्वभावें
शेषें परी तो ध्वनि ऐकवेना
विघूर्णला अर्णव वर्णवेना ॥ ५८ ॥

उपजाति कुलाद्रि तेव्हां खचले कडाडे
नादावलें अंबर तें धडाडें
तडाडितां भू फणिक(कू)र्म धाके
प्रकंपले सर्वहि लोक लोकें ॥ ५९ ॥

योजूनि चंद्रार्धमुखाशुगातें
वोढूनि आकर्ण शरासनातें
जपोनि वायव्य महास्त्र तेजें
विसर्जिला सायक वीरराजें ॥ ६० ॥

व. ति. तों गृध्रपत्रमणिचित्रितपुंखपत्री
जातां नभा कवळुनी उजळे धरित्री
पक्षानिलेंच भरला गगनीं धुमारा
ताराग्रहांस घडला क्षितिलोक थारा ॥ ६१ ॥

तेणें अपूर्व नत सर्व सुपर्व जालें
दिग्वर्गखर्वकरशर्वविलासशीलें
अत्यंतसें झगडुनी रिपुकंठनाळां
स्वर्वाहिनीकमळसें खुडिलें शिराला ॥ ६२ ॥

विध्वस्तशेखरविमुक्तशिरोरुहांशीं
सत्कुंडलोज्ज्वलमहाशिर ऊर्ध्वदेशीं
अस्त्रप्रभंजनभरें भ्रमतानुपातीं
स्वर्भानु अन्य गमला रविचंद्रचित्तीं ॥ ६३ ॥

व. ति. दंभोलिपाणिहतमंदरशृंगरूपें
मायावतींत पडतां शिर तें अपापें
रामें त्वरा करुनि वज्रशरप्रतापें
मध्यार्णवीं बुडविलें अरिरुंड कोपें ॥ ६४ ॥

इंद्रवज्रा कबंधपातें जलजंतुकोटी
जाल्या जळीं चोपट ऊर्मि दाटी
देखूनि तें कौतुक देवराजें
केली स्तुती आपुलिया समाजें ॥ ६५ ॥

उपजाति रामा तुवां दाशरथिस्वरूपें
प्रताप केला अमरारिलोपें
इंद्रें असें बोलुनि पुष्पवर्षें
तो पूजिला वाद्यरवें प्रहर्षें ॥ ६६ ॥

" श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
उल्लास हा पंचम चित्र जाला ॥ ६७ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये बलरामकृत
चित्रसेनासुरवधोनाम पंचमोल्लासः ॥ ५ ॥

## षष्ठोल्लास

इंद्रवज्रा श्रीकृष्णबंधूत्तमपत्रिमानें
भोगुनिही सत्पद संभ्रमानें
आले द्विषत्शी(च्छी)र्ष अपुण्यभारें
मायावतीमाजि सभेपुढारें ॥ १ ॥

व. ति. देखोनि तों अनुजमस्तक अग्रभागीं
सिंहासनावरुनि दैत्य सभांतरंगीं
मूर्च्छाविमोहित पडोनि म्हणे अहाहा
देवांतक प्रशमिला जड मानवीं हा ॥ २ ॥

उपजाति तें वृत्त ऐकोनि सभेस वेगीं
पत्नी तयाची वरमोहनांगी
धाऊनि आली रुदितस्वरानें
विलोकिलें तें प्रिय-शीर तीनें ॥ ३ ॥

व. ति. अत्यादरें पतिशिर स्वकरद्वयानें
आलिंगिलें पुसुनिया पदरें सतीनें
निर्भिन्नलें रुधिरपूरित वक्त्र तैसें
चुंबोनि तें प्रलपली प्रभु केंवि ऐसें ॥ ४ ॥

इंद्रवज्रा तो इंद्र वैवस्वत पाशपाणी
वित्तेश जिंतूनि कठोर बाणीं
केलें सुखी साग्र तुं सैन्यपाळा
त्या अंतही पाहसि आजि डोळां ॥ ५ ॥

उपजाति हरोनि दिव्याभरणें शचीचीं
देतां मला नित्य रविप्रभेचीं
आणीकही काय असे अपेक्षा
वाक्यें अशा आळवणार दक्षा ॥ ६ ॥

,, कां आजि घालूनि मुखास मुद्रा
आहेसि मत्संपतिच्या समुद्रा
कीं नाणिलें सद्वसनादि कांहीं
म्हणोनि लाजे न वदेसि कांहीं ॥ ७ ॥

इंद्रवज्रा वीरोत्तमा आइक चित्रसेना
संरक्षितांही अमरारिसेना
माझ्या मतें तूजविना दिसेना
आश्वासिलें आजि विचित्रसेना ॥ ८ ॥

,, क्रीडागृहीं तूं असतां सुखानें
युद्धास जाणें घडलें त्वरेनें
अतृप्त कामें तुज कोप आला
ऐसेंच माझ्या गमतें मनाला ॥ ९ ॥

उपजाति नाहीं कधीं म्यां अपमान केला
तांही नसे रे धरिला अबोला
आजन्म मी वासर हा न देखें
वद प्रियत्वें तनू हे न राखें ॥ १० ॥

उपजाति विख्यातवी रात्रिदिवीं विराजे
सुलोचना इंद्रजितासवें जे
तिच्यासमत्वें प्रभु तूजशीं मी
क्रीडेन लोकांतर-दिव्यधामीं ॥ ११ ॥

भु. प्र. असी फार आक्रोशतां मोहनांगी
धरे लोटली नाथ-सौभाग्य-भोगी
सभेमाजि तेणें महाशब्द होतां
त्वरें पातली मोहिनी राजकांता ॥ १२ ॥

मालिनी उचलुनि निज बाहीं मोहनांगीस तीतें
निरखुनि अशरीरी देवराच्या शिरातें
सरुदित वदनीं ते वोखटें दैव जालें
दृढ जलनिधि-तारू थिल्लरीं कां बुडालें ॥ १३ ॥

व. ति. वैचित्रसेनप्रभुदक्षिणदक्षबाहू
इंद्रादिकीर्तिविधुमंडलकाळराहू
हा चित्रसेन यम केवळ त्या यमाचा
त्या भेटला कवण तो यम आजि साचा ॥ १४ ॥

ऐसा प्रलाप करितां दनुजेंद्रकांता
आकांत थोर गमला सुरशत्रुकांता
तो बोलिला स्वदयिते बहु हे विरागी
ने मंदिरा सपदि दुःखित मोहनांगी ॥ १५ ॥

स्रग्धरा माझ्या क्रोधप्रदीप्तप्रळयहुतभुजीं आजि वैरीपतंगा
साश्चर्यें सांठऊनी निवविन तुमच्या तापल्या अंतरंगा
ऐसें बोलूनि त्यांला झडकरि भुवना पाठऊनी सुचित्तें
मायादेवीप्रसादास्तव सुररिपुनें चिंतिलें हो मयातें ॥ १६ ॥

उपजाति तो स्मर्तृगामी मयदैत्य आला
विचित्रसेनें बहु शोक केला
तें चित्रसेनासन दाखवीलें
तेणें तयाहीं अति सौख्य ? (दुःख) जालें ॥ १७ ॥

पृथ्वी म्हणे मय धरी धृती करवि सज्ज सेनेप्रती
तुतें अमर कांपती इतर पामरें तें किती
मदीयकृत संपती चर करीन मायावती
यदुप्रवरसंहती भ्रमउनी वधी निश्चितीं ॥ १८ ॥

उपजाति विचार ऐसा करुनी ससैन्यें
विचित्रसेनें असतां जघन्यें
येरीकडे कोपुनि तालकेतू
म्हणे असे काय विपक्षहेतू ॥ १९ ॥

,, संहारिल्यानंतर चित्रसेना
युद्धास येतां दुसरा दिसेना
चहूंकडे वेढुनि कोट वेगीं
मारा करा दुःसह अंतरंगीं ॥ २० ॥

इंद्रवज्रा रामोक्ति ऐकोनि अशा प्रकारें
तों बोलिला जी सुमती विचारें
वीरेंद्र हो सावध दुर्ग वेढा
मायावती घात करील गाढा ॥ २१ ॥

,, हांसोनिया काम म्हणे तयातें
मायागुरू मीच कळेल तूंतें
बोलोनि ऐसें दुसऱ्या शतांगीं
बैसोनि चाले स्मर अग्रभागीं ॥ २२ ॥

शा. वि. मूर्च्छा सांवरुनी कुमार हरिचे यानांतरारूढले
क्रोधें येकवटोनि संघहि दळें पूर्वक्रमें चालिलें
सिंधू उत्तर-पूर्व दक्षिणदिशेलागूनि दुर्गा दिसे
तेणें निर्जल पश्चिमेस सकळीं संरोधिजेलें असे ॥ २३ ॥

उपजाति ऐकोनि यावे वहु यादवांचे
उठावले सैनिक दानवांचे
विचित्रसेना नमुनी निघाले
पृथक् दळें बाहेरि सर्व आले ॥ २४ ॥

इंद्रवज्रा नामाथिले दैत्य पराक्रमानें
सांगेन आतां समरक्रियानें
दोहींकडेही चतुरंग सेना
सन्नद्ध जाली गणना दिसेना ॥ २५ ॥

शा. वि. नानावर्ण-रथध्वजें झळकतीं सौमेरवाग्रापरी
नाना पर्वतसे मदेभ गमती शृंगारले अंबरीं
नानाजाति-तुरंग भासति गती मोटचा खगासारिखे
नानाकार कृतांतकिंकरबळें होती पदाती सखे ॥ २६ ॥

इंद्रवज्रा दोहींकडे वाजति चंडवाद्यें
दोहींकडे गर्जति भाट गद्यें
दोहींकडे सैनिक वीर गाढे
दोन्हींकडे सैन्य समान लोटे ॥ २७ ॥

शा. वि. वादित्रारव आणि बंदिनिनद प्रोच्चंड वीरध्वनी
जाला येक युगांतकाळ गमला त्र्यैलोक्यवासी जनीं
घे घे घोष उठावला प्रबळला संग्राम तो माजला
होतां पाहत देवसंघ गगनीं धाकें पळों लागला ॥ २८ ॥

उपजाति　रथी रथांचे गजी गजांचे
हयी हयांचे पदिचे पदाचे
स्वनामघोषें रणशूर वैरें
परस्परें हाणिति शस्त्रभारें　　　　॥ २९ ॥

भु. प्र.　गदातोमरें खेटपट्टीशशूलें
वळी भीडती ते धनुर्बाणजालें
किती भिंडिमाला करस्थाग्नियंत्रें
किती मारिती वृक्षपाषाणमात्रें　　　　॥ ३० ॥

,,　रणीं त्या खणाणा दणाणा सणाणा
ध्वनी ऊठती वीर आले स्फुराणा
धबाबा धबाबा गळें रक्त धांवें
अबाबा असा शब्द कांहीं उठावे　　　　॥ ३१ ॥

,,　किती भेदिती छेदिती अंगअंगीं
किती हाकिती ठोकिती युद्धरंगीं
किती धांवती भोंवती भी भ्रमानें
किती त्रासती हांसती संभ्रमानें　　　　॥ ३२ ॥

,,　तटीं सिंधुचे नाचतां तें कबंधें
विटाऊं रणीं नाचलीं त्या कबंधें
तया नाट्यलीलाविनोदें विखंडें
उदंडें अहो हांसलीं वीरमुंडें　　　　॥ ३३ ॥

,,　अशी देखतां ते रणश्री भरानें
उडी टाकिली क्रुद्ध संकर्षणानें
म्हणे वीर जेठी रथा-सारथ्यानें
उणें युद्ध वाटे पराधीनतेनें　　　　॥ ३४ ॥

मालिनी वदुनि यदुमणी तो यापरी काळरूपी
अदट मिसळला तो दैत्यसंघीं प्रतापी
सदृढ कवळुनी त्या सीरपाशें विपक्षा
प्रबळ मुसळदंडें मांडितां होय शिक्षा ॥ ३५ ॥

इंद्रवज्रा एकैक घाई शत दानवांतें
वोढूनि पाडी कटिचूर त्यांतें
ना अस्थि ना मांस करूनि मेदें
टाकूनि आणीक पुढें चलूं दे ॥ ३६ ॥

उपजाति रथें रथा आणि गजें गजासीं
हयें हया मर्दित वीर्यराशी
ऐसा महामार करीत आला
कल्पांत त्या दैत्यदळांत जाला ॥ ३७ ॥

पृथ्वी हलायुध-बलार्दित-स्वदळ पाठिशीं घालुनी
पृथक्पृथगरातिचे प्रबळ सैनिक क्षोभुनी
रणाभिमुख लोटले यदुधुरीण ते हाकिले
समानपद पौरुषें क्षण सुरांस ते भासले ॥ ३८ ॥

उपजाति तों दंडपाणी निजदंडघातें
करी उभे त्या मुसलायुधातें
विचित्रकेतू स्वकठोरबाणीं
विंधी स्मरा गर्जुनि घोर वाणी ॥ ३९ ॥

इंद्रवज्रा संग्रामशूरा रणदुर्मदाने
लोकांतकें सात्यकिला त्वरेनें
पाचारिलें दाउनि नीचतेतें
चित्रध्वजेंही मदनात्मजातें ॥ ४० ॥

द्रु. वि. मुसलदंडनिघात दणाणिती
उभय हस्तहि मस्त दणाणिती
उसळती हुतभुक्कण अंबरीं
सहवधू सुर धांवति अंतरीं ॥ ४१ ॥

उपजाति विसर्जितां वन्हि विलग्न वस्त्रें
विमोहिलीं तें मिथुनें स्मरास्त्रें
विनोद जाला क्षिति योधकांला
वीरांत शृंगार अहो उदेला ॥ ४२ ॥

व. ति. कामातुरांस भय लाज नसे म्हणोनी
जें ऐकिलें निरखिलें यदुजां सुरांनीं
केलें विमुक्त सकळीं रण कौतुकानें
आरंभलें मदनयुद्ध अपूर्वतेनें ॥ ४३ ॥

स्वागता निर्जरी प्रकटती रतिदंभा
पीडिती विबुध तत्कुचकुंभा
चुंबिती मुख परस्पर तोषें
क्रीडती दिविंच कामविशेषें ॥ ४४ ॥

उपजाति इंदीवराक्षीं स्वकटाक्षबाणें
विंधी न जों तोंच विधीप्रमाणें
विवेक जागे विबुधांतरंगीं
भगांग जाला विबुधेंद्र भोगी ॥ ४५ ॥

,, नग्न स्त्रिया देखुनि निर्जरांच्या
भ्रमाथिल्या धी जड दानवांच्या
ते पांचही येकसरें उडाले
शस्त्रास्त्र-यानांस विरक्त जाले ॥ ४६ ॥

उपजाति गळा गिळी मत्स्य तदामिषातें
परी हरे आपण धीवरातें
तैसें वधू-भ्रांत सुरारि जाले
ते यादवीं बाण विभिन्न केले ॥ ४७ ॥

उपेंद्र. पाणिपदोत्तमांगीं
विभेदिलें कुक्षिस वक्षभागीं
अनंत येकाग्र मनें निघाले
किं टाळिसें सर्व अनंग जाले ॥ ४८ ॥

प्र. सुरेभाहवि पंचवक्त्रप्रतापीं
चमूप्राण ते पांचही एकरूपी
रणीं पंचबाणें प्रपंचत्व-सिद्धी
प्रपंचत्व ते पावले ऐक्यबुद्धी ॥ ४९ ॥

उपजाति झंझानिलध्वस्तनवाभ्रलीलें
दाशार्हभग्नारि पळोनि गेले
स्वीयां प्रलंबघ्न म्हणे प्रवेगें
पुरीं प्रवेशा हतशेष मागें ॥ ५० ॥

त्यानंतरें दैत्य विभग्न जाले
देखोनि वार्ष्णीय चढोनि आले
विचित्रसेनें मयमंत्रजालें
मायापुरी तंवरि चालवीले ॥ ५१ ॥

व. ति. आकाश दुस्तर समुद्र विचित्र नौका
मायावती विलसती विचलत्पताका
ते देखिली यदुवरीं मग ऊर्ध्वदृष्टी
केली अमोघतर दुष्करबाणवृष्टी ॥ ५२ ॥

उपजति
मायावती ते गगनस्थळोसीं
विराजवी यंत्र घनाघनासीं
उद्भासितां रंजक बीजमेळा
कडाडवी लोकहृदंतराला ॥ ५३ ॥

,,
त्या लोहपिंडाशनिचंडपातें
विभेदिलें यादव-भूभृतांतें
तद्रत्नधातूज्ज्वलमौळिशृंगें
विलोकितीं भिन्न अशी अनंगें ॥ ५४ ॥

शा. वि.
ऐसें अंबरगासुरें विरचितां तो शंबरारी तदा
माया चिंतुनि शांबरी प्रबळला मर्दूं तया दुर्मदां
तें गांधर्वपुरासमान मदना आलें विमान स्वयें
तेथें बैसुनि मन्मथें रणकळा विस्तारिली विस्मयें ॥ ५५ ॥

उपेंद्र.
समान शस्त्रास्त्र महाग्नियंत्रें
समान सेना कपटैकसूत्रें
समान विद्याविभवास धर्ता
समान ते मायिक युद्धकर्ता ॥ ५६ ॥

वंशस्थ
क्षणैक ते सांग रणांत दीसती
क्षणैक दोघेहि अनंग भासती
क्षणैक आले वसुधेस वाटती
क्षणैक सिधूर्ध्व खगास भेटती ॥ ५७ ॥

रथोद्धता
इंद्रजालक महेंद्रजालका–
सारिखें कपटयुद्ध कौतुका
दाविती उभयतां पराक्रमी
पाहती सकळ लोक संभ्रमीं ॥ ५८ ॥

व. ति. जे-जेकडे पुरविमान वरूनि धांवें
ते-तेकडे यदुपसैन्य तळीं उठावें
होतां असें रण अनंगमहासुराचें
ब्रह्मादिकां नवल तें गमलें शुकाचें ॥ ५९ ॥

उपजाति देखूनि तें कौतुक चारणांनीं
प्रशंसितां कीरवरावरूनी
तो शब्द आला व्रजराजकर्णीं
जाला बहू विस्मय त्या सुपर्णी ॥ ६० ॥

शा. वि. बोले त्यावरि वासुदेव गरुडा आश्चर्य हें कायसें
या लीलाशुकभाषणें यदुवरीं संग्राम केला असे
व्योमीं चारण बोलती शुकहि तो अद्यापि कां थोंकला
शोधी तोंवरि रात्रि सिंधुसदनीं राहोनि आच्छादला ॥ ६१ ॥

उपजाति बोलोनि ऐसें हरि सिद्ध जाला
खगेश्वरीं बैसुनिया निघाला
आला हरिद्राह्वयसिंधुसद्मा
विलोकितां होय तदीय पद्मां ॥ ६२ ॥

श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
उल्लास हा षष्ठ वरिष्ठ जाला ॥ ६३ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये अनंगमहासुर-
युद्धनाम षष्ठोल्लासः ॥ ६ ॥

## सप्तमोल्लास

व. ति.

श्रीकृष्ण तो कपटनायक सूत्रधारी
बैसोनि सिंधुसदनीं निजरुष्टनारी
चिंतोनि त्या वश करूं सदुपाय चित्तीं
तों देखिली स्फुट निशा सरितां निशांतीं ॥ १ ॥

शा. वि.

भृंगांचें मधुपान आणि रमणें त्या सारसांचें दळीं
दृष्टीं देखुनि सारसाक्ष हृदईं चिंती तसें तें स्थळीं
तें जाणोनि हरींगित द्विजपती अंतःपुरा पातला
लीलाकीर तदुक्तितें श्रुतिमुखें सेऊनिया बोलिला ॥ २ ॥

उपजाति

पतिव्रतांनो तुमच्याच पुण्यें
लंघूनिया दुर्गगिरीअरण्यें
अकाय घोरासुर युद्धरंगीं
जिणोनि आला प्रभु ये प्रसंगीं ॥ ३ ॥

भु. प्र.

हरिद्रानदीमध्यसौधीं हरीनें
असे वास केला विशेष श्रमानें
शुकें यापरी सांगतां तुष्ट जाली
पुढें ऋक्षराजन्यकन्या निघाली ॥ ४ ॥

वंशस्थ
समूह तो सर्वहि तीसमागमें
निघेलसा देखुनि बुद्धिविक्रमें
अभिज्ञ सत्राजितराजनंदिनी
त्वरें निघाली कलहंसगामिनी ॥ ५ ॥

उपजाति
सोळा सहस्रावरि सात मुख्या
राजस्त्रिया आणि सख्या असंख्या
अंत.पुराबाहेरि सर्व आल्या
ह्या नयानेंच ह्कूं निघाल्या ॥ ६ ॥

शा. वि.
पाठीं घालुनि गोरथादिशिबिका मत्तेभल्या(त्या)चालिल्या
कोणीही सवतीपणें न दिसतां एकोदरा भासल्या
अंगुल्यग्र परस्परें धरुनिया आश्चर्य हें मानिती
कैंचा कोण अकाय दैत्य हरिचा द्वेषी असें बोलती ॥ ७ ॥

उपजाति
ते कंचुकी उद्‌भट वेत्रपाणी
चौताळुनी गर्जति भीम वाणी
निरोधितां ते नरमात्र वाटे
नारीजनीं उत्तरपंथ दाटे ॥ ८ ॥

शा. वि
मार्गीं ध्यात मुकुंद कुंदरदना चंद्रानना सुंदरी
जातां जंगमजातरूपलतिका त्यां मानिती नागरी
तद्रत्नाभरणें विचित्र सुमनें उन्मीललीं दीसतीं
त्यांचें सिंजित भृंगगुंजित असें त्यांचीं मनें भावितीं ॥ ९ ॥

भु. प्र,
मुहुर्तत्रयामाजि आश्चिर्य पाहा
किती आजि चंडद्युती तावितो हा
असें बोलतां सत्यभामादिकांनीं
क्षणें व्योम आच्छादिलें चेटिकांनीं ॥ १० ॥

शा. वि. सूर्यापानवितानलीनतपनोद्भिन्नातपाडंबरा
मायूरव्यजन-प्रभूत-पवन-व्यालोल-सूक्ष्मांबरा
नानाछत्रविचित्रकांतिविलसद्दिक्चक्रवालांतरा
आल्या सर्वहि यादवेंद्रदयिता सिंधूतटा सत्वरा ॥ ११ ॥

भु. प्र. हरिद्रासरित्तीर वेष्टूनि देखा
उभ्या ठाकतां गोपकांता सुरेखा
गमे मागुती कृष्णयुद्धा अनेकां
स्मरें शोभवील्या जयश्रीपताका ॥ १२ ॥

शा. वि. त्यांचा मंगल तूर्यघोष हरिच्या कर्णांवरी तोंवरी
आला जांबवतीकरस्थ शुक तो गोपालहस्तावरी
केला आदर फार कीरतिलका कुर्वाळुनी श्रीकरें
जाला तद्वदनें प्रसंग विभुतें संवेद्य पूर्वोत्तरें ॥ १३ ॥

उपजाति नावा तयानंतर आणवील्या
राजस्त्रिया मात्र बसोनि गेल्या
तयांसवें भक्ष्यपदार्थ नाना
आले बहू ते मधुकुंभ पाना ॥ १४ ॥

इंद्रवज्रा गोविंद गोपाळ मुकुंद नांवें
संक्षेपणीं पाणियुगप्रभावें
तोडूनि पाणी द्रुत कर्णधारीं
नेल्या तरी सैंधवमध्यनीरीं ॥ १५ ॥

शिखरिणी समुद्रांतर्द्वीपासम परम त्या सिंधुसदना
क्रमें सर्वा आल्या उतरुनि पथें कुंदरदना
पहात्या जाल्या त्या सकळहि मनोदीप्तमदना
पुढें डोलाव(रा)त्यावरि पहुडल्या इंदुवदना ॥ १६ ॥

स्वागता सूक्ष्म हेमपट पांघरलासे
जागरूक हरि आंत विलासे
मंचकस्थ शुक त्यां वदला हो
श्रांत देव न करा लवला हो ॥ १७ ॥

उपजाति पापी अकायासुर कूट योद्धा
करूनि त्यासी अतिरात्र युद्धा
आली बहु भ्रांति यदूद्वहांगा
अद्यापि देवेश नव्हेच जागा ॥ १८ ॥

" ऐकोनि ऐशा द्विजभाषणातें
न वाजवीतां निजभूषणांतें
भामा निवारूनि करें शुकातें
काढूं निघाली वदनांशुकातें ॥ १९ ॥

" तों जागृती दाउनि राजगोपें
त्या काढिलें प्रावरणा अपापें
कलत्रमात्रीं हरि देत दृष्टी
केली तीहीं स्वर्णसुपुष्पवृष्टी ॥ २० ॥

द्रु. वि. मग उठोनि यदूत्तम बैसला
सकळिकांसह सादर बोलिला
गुणवती रमणीमणिनो महा
श्रम तुम्हां घडला इतुका पहा ॥ २१ ॥

" शुक तदा वदला विभु योषिता
अखिल या भवदर्पितजीविता
परिसतांच तवागति धांवल्या
त्यजुनि वाहन चालत पातल्या ॥ २२ ॥

भु. प्र. पुढारोनि तैं बोलिली सत्यभामा
प्रभू आमुच्या सर्वसौभाग्यधामा
तुझ्या दर्शनें लंघिली खेदसीमा
अकायासुरारिष्ट पावो विरामा ॥ २३ ॥

,, विरामार्थ जाला विचित्रप्रभूतें
विशेषें भजे मार रामा-व्रजातें
असा भावितां भाव चित्तीं मुकुंदें
अभिज्ञा पुन्हा बोलली ते विनोदें ॥ २४ ॥

उपजाति स्वामी अकायासुरशस्त्रपातें
कीं भेदिलें वर्मविहीन तूंतें
हरी म्हणे गोष्टि नको पुसूं ते
जे चिंतितां हे तनु भिन्न होते ॥ २५ ॥

इंद्रवज्रा आकर्ण ते बाण ममांतरंगा
विंधूनि गेले सखि तन्निषंगा
त्यानंतरें शूल करस्थ त्याचे
जालें रणीं भेदक या तनूचे ॥ २६ ॥

उपजाति निवारिलें फार परंतु कांहीं
उग्राग्र मोटे रुतले स्वदेहीं
म्हणोनि कांतें नखघात दावी
जाणोनि येरी मग चित्र भावी ॥ २७ ॥

,, भामा म्हणे संगरवीरभद्रा
आंगास कां लागलिसे हरिद्रा
वदे हरी अद्भुत इंद्रशक्ती
प्रत्यक्ष जाली मज एकभक्ती ॥ २८ ॥

उपजाति
माझें उपेंद्रत्व कळोनि तीनें
आलिंगिलें वो मज आदरानें
प्रसाद तीचा स्फुट हा विराजे
येणेंचि गेले व्रण सर्व वोजें ॥ २९ ॥

इंद्रवज्रा
सत्या म्हणे कोण महत्त्व पाहा
दंतच्छदाघात दिसे वदा हा
त्याही दिल्हें उत्तर धूर्तराजें
हा भेदिला मद्रद कोप माझे ॥ ३० ॥

शिखरिणी
शुकाज्ञेनें कांतें क्षण वसवितां क्षीरनिधितें
अदेहाचें युद्धागमन कळलें खेचरमतें
निघावें तों निद्राभरण भरले पूर्ण नयनीं
महाश्रांतीनें मी दृढ पहुडलों दैव म्हणुनी ॥ ३१ ॥

उपजाति
पुसे पुन्हा ते विदुषी स्वभावें
केला कसा सिंधुनिवास देवें
विनोदशाली वदला अगाधा
ते पूसशी काय विचित्र गाथा ॥ ३२ ॥

मंदाक्रांता
मत्प्रारब्ध प्रबळ अथवा तूमचें भाग्य मोटें
एकाएकीं निनद बहु हा ऐकतां एकवाटें
जागा जालों तंव निरखिलें या तुम्हां क्षेमदृष्टीं
आश्चर्यें हें स्थलहि घडलें पावला तोषपुष्टी ॥ ३३ ॥

उपजाति
मुरारि ऐसें वदतां त्वरेनें
तो बोलिला कीर चमत्कृतीनें
म्यां ऐकिलें हेंच महांडजातें
अरिष्ट बाधील कसें प्रभूतें ॥ ३४ ॥

उपजाति प्रसंग ऐसा परिसोनि कांता
विघ्नोपशांतीस्तव त्या अनंता-
वरोनि कुर्वंडिति वित्तवस्त्रें
विलास केला जनरत्नसूत्रें ॥ ३५ ॥

रथोद्धता ऋक्षराजतनया नयाथिली
स्वप्रिया समयसार बोलिली
ग्लानि दीसत बहू सुखाकरा
क्षाळिजे मुखकरांघ्रि पुष्करा ॥ ३६ ॥

शा. वि. नीलेनें जल दीधलें यदुवरें पूर्वाण्हिका सारिलें
भद्रेनें घनरत्नताट पुढती आणूनिया ठेविलें
भक्षातें बहु वाढिलें कुसरिनें या लक्षणेनें फळें
हातीं घेउनि दिव्य चामर वरी कालिंदिनें वारिलें ॥ ३७ ॥

भु. प्र. पुढें ठाकिली देखिली मित्रवृंदा
प्रभू बोलिला या तुझ्या मित्र-वृंदा
सवें घेउनी बैस तूं याचि ताटीं
न होतां असें येइना तृप्ति पोटीं ॥ ३८ ॥

उपजति ते मस्तकीं वाहुनि वल्लभाज्ञा
आरोगणा होउनि सिद्ध सूज्ञा
सभोंवती मांडुनि हेमताटें
त्या बैसल्या सर्वहि येकवाटें ॥ ३९ ॥

वंशस्थ स्त्रिया निज प्रीतिपदार्थ सेविती
प्रियाननीं ग्रासहि तेच अर्पिती
चहूंकडूनी अबलामितक्रमें
अनंत जाला बहुवक्त्र संभ्रमें ॥ ४० ॥

उपजाति सोळा सहस्त्रावरि सात जाया
ग्रासार्पितां यादव-भागधेया
अतृप्त देखोनि सलज्ज जाल्या
स्वभोजनातें विसरोन ठेल्या ॥ ४१ ॥

इंद्रवज्रा आश्चर्य तें फार मनीं गणोनी
केली हरीची स्तुति त्या स्त्रियांनीं
त्यानंतरें हांसुनिया तयांतें
संतृप्त केलें स्वकरें अनंतें ॥ ४२ ॥

मालिनी तदुपरि मुदितां तत्कृतिनें ब८९
बहुविध मधुपात्रें शोषिलीं सावकाशें
सकळहि दयितांतें आपुल्या पानशेषें
मदपरवश केल्या कामसंग्रामतोषें ॥ ४३ ॥

इंद्रवज्रा जो आपणां आसव दे रुचीतें
तो प्राशितां पाजिति त्या प्रियांतें
ऐसा महादुर्मद वारुणीनें
उन्मत्त जाल्या प्रमदा क्षणानें ॥ ४४ ॥

उपजाति मनें तयांचीं अति मत्त जालीं
हस्ताब्जिचीं तें चषकें गळालीं
नेत्रांत त्यांच्या मदशोणधूर्मी
मानी हरी काममहार्णवोर्मी ॥ ४५ ॥

उन्माद तो नावरतां भ्रमानें
अन्योन्य त्या मोहुनि संभ्रमानें
स्त्रिया स्त्रियांसीं पुरुषप्रकारें
क्रीडों निघाल्या मदनाधिकारें ॥ ४६ ॥

उपजाति परस्परें अंबरकंचुकीतें
फेडूनि आलिंगिति मत्तचित्तें
प्रमर्दिती गौर घनस्तनांतें
दंतक्षतें चुंबिति आननातें ॥ ४७ ॥

शा. वि. निर्मर्याद असा प्रसंग हरिनें देखोनि लीलाभ्रमें
केला कामविलास जो(तो)न वदवे जो अन्यवाणीक्रमें
वक्ता तोच तसे प्रबंध घडले त्या श्यामराजाननें
जैसें कौरव विश्वरूपहत ते संहारिलें अर्जुनें ॥ ४८ ॥

भु. प्र. असो फेड हा त्यावरी चक्रपाणी
गणूनी हरिद्रापगागाध पाणी
स्थिरत्वें कसें क्रीडजें या स्त्रियांनीं
असें बोलतां बोलिला व्योमयानी ॥ ४९ ॥

द्रु. वि. यदुवरा भुवनत्रयपालका
स्वमतिनेंच चराचरपालका
निवसवी निजचक्र जलाकरीं
तदुपरी स्थिर तें रुचलें करी ॥ ५० ॥

उपजाति सदुत्तरें गोप वदे शुकातें
जाला नसे कीं मधुलाभ तूंतें
येरू म्हणे जो मधुसूदनातें
सेवी सदा तो न भजेच त्यातें ॥ ५१ ॥

इंद्रवज्रा केलें हरें दुर्विषपान तैसें
या पामरानीं करिजेल कैसें
ऐसें हरि त्वच्चरित स्मरावें
आम्ही जनीं निश्चित नाचरावें ॥ ५२ ॥

उपेंद्र. विवेक देखोनि असा शुकाचा
यथार्थनामा द्विज तूं त्रिवाचा
म्हणोनि कृष्णें गुणबद्धपक्षी
विमुक्त केला स्वविलाससाक्षी ॥ ५३ ॥

भु. प्र. मदाभीरु जाल्या तदा भीरुचक्रा
जळीं क्रीडऊं प्रेरुनी चारुचक्रा
करूनी क्षणें अंगनाकंठ पाणी
हरी जाहला दिव्य सर्वांगपाणी ॥ ५४ ॥

" नरव्यक्तिच्या भूचराखेचरातें
प्रदेशीं तया वर्जिलें गोपकांतें
करी विश्वसर्ग-स्थिति-प्रांत त्यातें
महा थोर हें काय वाटे मनातें ॥ ५५ ॥

शा. वि. गेले नाविक वृद्ध चार परिही ते कंचुकीशासनें
क्रीडादेश विलंघुनी वसविला आकाश सर्पाननें
आला माधव तों मदोद्धतवधूव्यूहें जलाभीतरी
उन्मादें हरिशीं रमों सकळही चौताळल्या सुंदरी ॥ ५६ ॥

पृथ्वी सलील-सलिलांजली ललित-शोणपद्मेक्षणा
समर्पिति हरीवरी नुघडवे जसें ईक्षणा
अनेक करसारसें यदुवरें पया फारसें
तया उपरि चिंबिलें गगन तिंबिलें त्या रसें ॥ ५७ ॥

" तदंबुघनशीकरीं परततां गमे स्वर्धुनी
वरूनि उतरे निशा वरि सरित्सखी चिंतुनी
अधोर्ध्व पद योजितां जितबलीश्वरें भिन्नल्या
सुविष्णुपदवासिनी उभयतां पुन्हा भेटल्या ॥ ५८ ॥

भु. प्र. सरिल्लोलकल्लोल कीलाल जाले
चलत्कामकेतूल्लसल्लंबवाले
भुजंगभ्रमाभीरु भूपाळ-भीरू
मनीं मानितां होय तों तों अभीरू ॥ ५९ ॥

इंद्रवज्रा चक्रप्रधान द्विजचक्र तोयीं
होतें चलच्चक्र तया अपायी
स्त्रीचक्रबा(वा)लार्दित तें स्वनामें
संरक्षिलें अद्‌भुत चक्रधामें ॥ ६० ॥

भु. प्र. तदारभ्य त्या क्रूर नक्रादि जाती
हरिद्रानदीमाजि अक्रूर होती
म्हणोनी वधू उद्धवें क्रीडताती
असें लोक अद्यापिही देखताती ॥ ६१ ॥

शा. वि. तेव्हां व्हो कमळें कुशेशयकुळें सौगंधिकेंदीवरें
फुल्लें कोकनदें तसींच कुमुदें सत्पुंडरीकें भरे
नाळांसीं नखरें खुडोनि निकरें गोपांगना प्रेरितां
साचें;पुष्पशर-प्रचंड-रण तें जालें शुका देखतां ॥ ६२ ॥

पृथ्वी उपेंद्रदलितांबुजें निरवलंब रोलंब या
घनास अवलंबुनी गतिविलंब टाकूनिया
प्रलाप मुखझंकृतीछल करूनि इंद्राप्रती
स्वकीय घर घेतलें म्हणूनि काय ते सांगती ॥ ६३ ॥

परस्पर समीरण-प्रहृतपुष्पपुंजांतरें
पराग उधळे महा कनकरेणुवर्णी भरे
सुगंधि पटवास तो गमत केसरी केसरी
विलोचन-मदद्विपां विकलसें करी लौकरी ॥ ६४ ॥

स्रग्धरा गंडूषोद्दंडकांडें अतिशय करितां
घ्राणकर्णीं वधूंनीं
जाला धूर्तेंद्र गुप्त क्षणभरि सलिलीं
तो निघाला मधूनी
लीलाकीलालमग्नोत्थितकरिकरदृक्
पद्मिनीशा ललामा
वामा उद्दाम हस्तें कवळुनि रमतां
होय गोपाळ नामा ॥६५॥

भु. प्र. स्त्रिया जीतुक्या तीतुक्या गोप जाला
मुकुंदें तदा काम निःसीम केला
तवालोकनें मोहल्या कोटिकोटी
तटस्था तटस्थाच जाल्या वधूटी ॥ ६६ ॥

स्वकांतें असें क्रीडिजे याप्रकारें
पुरंध्रीजनीं भावितां हृद्विकारें
यदूत्तंस सर्वत्र आत्मा जगाचा
क्षणें पूर्ण केला तसा काम त्यांचा ॥ ६७ ॥

तयेच्या तयेच्या पतिप्रायरूपें
जलीं त्यांसही भोगिलें राजगोपें
स्तनापीडनें चुंबनें मैथुनेसीं
विशेषें रळी मांडली सिंधुदेशीं ॥ ६८ ॥

इंद्रवज्रा स्वस्वप्रियांसीं रमतो परंतू
एके स्थळीं कामविलासहेतू
होतो म्हणोनी अति लाजल्या त्या
जाल्या जळांतूनि तटास जात्या ॥ ६९ ॥

शा. वि. तीरीं जाउनि पाहती तंव दिसे श्रीकांत आला वरी
तोही आपण नग्न देखुनि पुन्हा येती जलाभीतरी
ये रीतीं करितां महाजलरती मत्तस्थिती गोपती
जाली दुर्धर पौरघोरवदनें ते द्वारका गर्जती ॥ ७० ॥

उपजाति श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
उल्लास हा सप्तम सांग जाला ॥ ७१ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये जलक्रीडा–
वर्णनंनाम सप्तमोल्लासः ॥ ७ ॥

# अष्टमोल्लास

शा. वि. श्रीकृष्ण श्रमला वधूंसह मधून्मादें हरिद्राजळीं
त्यातें श्राव्य करूं समर्थ न दिसे कोण्ही असा या स्थळीं
नाहींही बलराम कोण समयीं रक्षील हें नांगरें
दैत्यीं चालुनि घेतलें निजपुरें या अंतरिक्षांतरें ॥ १ ॥

उपजाति यालागि व्हावा प्रभु साधु लोकीं
दयाळ कालोचित जाणता कीं
प्रजा अपत्यापरि रक्षणारा
विचारितां विश्वविचार चारां ॥ २ ॥

,, उदार कर्णासम कीर्तिशाली
शूर प्रतापें प्रगटांशुमाली
प्रहृष्टसैन्यें विबुध प्रधानीं
संरक्षितां राज्यहि राजधानी ॥ ३ ॥

भु. प्र. न लाभोनि ऐसा जरी लोक दैवें
मिळाला सदा मत्तकामी स्वभावें
परस्त्री परद्रव्य हारी विकारी
दयाशून्य लोभी असुरप्रकारी ॥ ४ ॥

भु. प्र. प्रजा हिंसितां ऐकतां नीचबुद्धी
न मानी मनीं पुण्य कीर्ति प्रसिद्धी
असो दुष्ट तो दुर्गुणाचा प्रसंगीं
सुधी माधवा कोण सांगेल वेगीं ॥ ५ ॥

„ असा पौरहांकेस ऐकोनि कर्णें
हरिद्रांतिका आक्रमीलें सुपर्णें
महोत्तुंग सौधाग्रवासी शुकातें
वरूनीच पाचारिलें पक्षियातें ॥ ६ ॥

„ सुधी कीर तो तत्समीपास गेला
समाचार तेणें शुका श्राव्य केला
उडोनी तिहीं पाहतां उंच दूरी
पुरीमस्तकीं देखिलें युद्ध भारी ॥ ७ ॥

व. ति. एकीकडे दनुजपट्टण अंतरिक्षीं
एकीकडे स्मरविमान तसेंच दक्षी
आटोपिलें निरखिलें रणही तयांचें
जाले सविस्मय महा मन पक्षियाचें ॥ ८ ॥

इंद्रवज्रा ते द्वारका वेष्टुनि बाह्यदेशीं
पाहे चमू ऊर्ध्व हलायुधासीं
केला तयानीं वरि बाणमारा
तो जाहला भेदक दैत्यभारा ॥ ९ ॥

स्वागता रुक्मिणीतनय चंडशरांनीं
खंडिल्या दनुजपाणिपदांनीं
मांडतां प्रळय पौरजनातें
क्रोध नावरत ये गरुडातें १०

भु. प्र.
विलोकूनि तो युद्ध सन्नद्ध कोपी
महादैत्यहंता खगेंद्र प्रतापी
तया बोलिला कीर गेल्या तुवांही
मुकुंदा नसे यान हो स्वस्थ राही ॥ ११ ॥

उपजाति
मी प्रार्थितों सत्वर माधवातें
वधील तो उद्भट दानवांतें
म्हणोनि आला शुक सिंधुदेशा
वरूनि जाला स्तवितां व्रजेशा ॥ १२ ॥

मालिनी
जय जय जगदीशा भूरिकारुण्यसिंधू
जय जय सुरशत्रुध्वंसका इंद्रबंधू
जय जय शरणार्थीत्राण-भृच्चक्रपाणी
जय जय बहलीला-लोल-शृंगारखाणी ॥ १३ ॥

शा. वि.
साभिप्राय शुकस्तुती परिसुनी श्रीराजगोपें घडीं
क्रीडा राहउनी वरी निरखितां तो बोलिला तांतडी
स्वामि त्वत्परिशोधनीं हलधरा आणीक घोरासुरा
जालें वाटत युद्ध तें शिणविती या द्वारकानागरां ॥ १४ ॥

उपजाति
पौरार्ति ऐकोनि कृपासमुद्रें
नेसोनि पीतांबर यादवेंद्रें
तों ठेविला स्त्रीजन सिंधुधामीं
प्रबोधिला क्रोध रणाग्रगामी ॥ १५ ॥

इंद्रवज्रा
दैत्यारि युद्धोचित सिद्ध जाला
तो स्मर्तृगामी खगराज आला
आवाहनें चक्रहि हो निघालें
तें द्वारकावैभव येक जालें ॥ १६ ॥

उपजाति या सैंधवांतःपुरसौधशृंगीं
राहे प्रतापें पडल्या प्रसंगीं
दिल्हा मुकुंदें वर हा शुकाला
पुरांगनौघ स्वगृहास गेला ॥ १७

स्रग्धरा श्रीराजद्राजगोपप्रभुरणनवरा कीरवाङ्निश्चयानें
लीलें वैचित्रसेनीं निरुपम विजयश्री वराया त्वरेनें
पक्षींद्रारूढ जाला मग खगतिलक व्योमगर्भी उडाला
वाटे गेला उपेंद्र स्वचरित सुचऊं त्या निजेंद्राग्रजाला ॥१८॥

इंद्रवज्रा पृथ्वीवरूनी उडतां खगेंद्रें
भारें फणा हालविल्या फणींद्रें
संबंध हा युक्त म्हणोनि तोषें
कीं तोलिलें मस्तक आदिशेषें ॥ १९ ॥

उपजाति पूर्वींच बाणासुरकन्यकेनें
स्मरात्मजातें वरिलें सुखानें
या कारणें आसुरसोयरीकें
करावया कृष्ण मनीं न शंके ॥ २० ॥

" त्यानंतरें गोपमुखाब्जलीलें
शंखारवें पूरित लोक जाले
घुमारतां नाद नभांतराळीं
तें बैसली दिग्गज-कर्णटाळी ॥ २१ ॥

मालिनी अभिनवघनघोषें गर्जतां पांचजन्यें
मनसिज रण केलें मुक्त देवारिमान्यें
सहरिख निरखाया यादवोद्दामवीरा
फिरवुनि पुर आला दैत्य कृष्णापुढारां २२॥

शा. वि. जें वेदीं स्तविलें सुरीं प्रणमिलें ब्रह्मादिकीं पूजिलें
जें सानंद विराजलें शिवमनीं जें गोकुळीं क्रीडलें
जें श्रीद्वारवतीभयास हरितें दोर्दंडलीलारसें
तें अत्युद्भट गोपरूप गरुडीं त्या देखिलें तामसें ॥ २३ ॥

उपजाति अचिंत्य जें सात्त्विक-राजसातें
तें दृश्य जालें अतितामसातें
परंतु हीराकर कोमलत्वें
भासे जडा त्या मतिच्या लघुत्वें ॥ २४ ॥

भु. प्र. तनुत्रा (प्रा?) णधारी जगत्राणकारी
किरीटी चलत्कुंडली वीर शौरी
गदा-शंख-चक्रोल्लसच्छार्ङ्‌ग पाणी
पुढें देखतां वर्षला दैत्य बाणीं ॥ २५ ॥

उपजाति स्ववज्रबाणावळि-पुष्पमाळा
घाली जयश्री नवमेघनीळा
ऐसें विलोकूनि विचित्रसेनें
संश्लाघिलें वृष्णिवरास मानें ॥ २६ ॥

" म्हणे सुरारी असुरारिवर्या
भला भला अद्‌भुत शौर्यसूर्या
विचित्रवीर्यार्णवसंभवा हे
तूंतें जयश्री-नवरी विमोहे ॥ २७ ॥

उपेंद्र. विचित्र रत्नाकर हा विशेषें
चित्रास्त्ररत्नाभरणें स्वतोषें
अर्पील ते यावरि घे सपर्या
म्हणोनि सज्जी दृढ कार्मुका या ॥ २८ ॥

उपजाति अनम्र तो दैत्य परंतु त्याचें
अ(आ)नम्र होतांच धनुर्गुणाचें
हरी म्हणे उन्नत वंशजाची
जातीच ऐसी मति नाश्रयाची ॥ २९ ॥

,, विचित्रसेनासुरवाण
शरीरसंबंध करूं हरीशीं
पुढारतां पुत्रकलत्रमित्रें
नादावलीं वाद्यकुळें सयंत्रें ॥ ३० ॥

व. वि. जन्योत्सवोद्भटमुरांतक पांचजन्यें
गर्जोनि तैं प्रगटली रिपु पांच जन्यें
पर्जन्यजन्यरव त्या प्रळयीं उदेले
राजन्य धन्य सुरमान्य तटस्थ जाले ॥ ३१ ॥

उपजाति कौमोदकी नंदक शार्ङ्गमूर्ती
सुदर्शनेसीं व्रजचक्रवर्ती
प्रार्थूनि युद्धा म्हणतांच मी-मी
त्यां बोलिला तुष्ट खगेंद्रगामी ॥ ३२ ॥

मालिनी मम परम सखेंनो आयुधांनो विलासें
सम समर करावें वाटतें आजि तैसें
अमरपतिरिपूनें सज्जिलें कार्मुकातें
म्हणुनि धरिन मीही शार्ङ्ग आधीं क्षणातें ॥ ३३ ॥

भु. प्र. स्वशस्त्रां असें बोलुनी ते प्रसंगीं
खगेंद्रास सन्मानिलें युद्धरंगीं
टणत्कारितां शार्ङ्ग लीलें मुरारी
थरारी भयें अंतरीं तो सुरारी ॥ ३४

उपजाति मयप्रसादस्मृतिधैर्यशाली
आजन्म युद्धोन्नत नैजमौळी
टंकारुनी चाप अमूपपत्रीं
प्रेरूनि दाटी नभ ही धरित्री ॥ ३५ ॥

व. ति. वारिप्रदासम शरीं रिचवी बुधारी
धारिष्ट-शैल न गणी हरि तादृशारी
शारीर दार्ढ्य वरि वर्म अरि प्रहारी
हारीस पात्र घडला क्षण वासवारी ॥ ३६ ॥

तत्कंकगृध्रशशि (शिखि?) पत्र विचित्रपत्रीं
आला करूं क्षत तऱ्ही हरिगात्रमैत्री
तत्राद्यमध्यहि अधःपतनार्ह जाले
ते सेवटील भजले अवतंसलीलें ॥ ३७ ॥

प्र. स्वपक्षी विपक्षांतही तो मिळाला
रणीं लाभतां पाहिजे आदरीला
म्हणोनी तया वर्हिबर्हावतंसें
शिरीं राखिला बर्हिपत्री विलासें ॥ ३८ ॥

उपजाति किरीट भेदूनि विपक्ष-बाणीं
विराजतां हांसुनि शार्ङ्गपाणी
तो रुक्मिणीनायक रुक्मपुंखा
शिलीमुखा प्रेरित चित्र देखा ॥ ३९ ॥

स्रग्धरा त्या एकीं कांडकोटी प्रभवति भंवती घालिती बाणजाली
मध्यें तो चित्रसेनाग्रज निरखितसे जन्मले ज्वालमाली
भासे वेतंडशुंडायत-हरिकरभून्मंडलाकारचापीं
कल्पांताग्नी उदेती त्रिभुवन कवळूं कालदंडस्वरूपी ॥ ४० ॥

व. ति. आधूम्रताम्रनयना नयनाभिरामा
रामा तदीय म्हणती करुणैकधामा
धामास या उपवनीं हरि पूर्णकामा
कां मातला समय हा न कळे रिकामा ॥ ४१ ॥

द्रु. वि. मय म्हणे अमृतास्त्र बळाब(व)लें
उपरि या करि वारुण मोकळें
जपत ते असुरेश्वर ते क्षणीं
प्रबळले घन वारिद वर्षणीं ॥ ४२ ॥

उपजाति अस्त्रांबुदाली निकरें गडाडी
नभस्थळीं त्या निनदे धडाडी
विद्युल्लताची ततिही कडाडी
भयार्णवीं द्वारवती दडाली ॥ ४३ ॥

मालिनी तदनु गगनयानें पातला मीनकेतू
नमुनि हरिस दावी भूतलोत्पातहेतू
अशनिविशिखपातें द्वारका धाक वाहे
वरुणनिकर वारूं अस्त्र वायव्य आहे ॥ ४४ ॥

तनयविनयवाक्यें हर्षला कैटभारी
स्मरुनि पवन शार्ङ्गीं सज्जिला बाण भारी
श्रुतिपथग करूनी प्रेरितां तो सुरारी
गगनपवन शार्ङ्गीं सज्जिला बाण भारी ॥ ४५ ॥

व. ति. अस्त्रानिलें झडपितांच युगांतलीलें
ते मेहुडे जलहुडे वितळोनि गेले
गारा विजांसह महांबु भरोनि तैसा
मायावतीं प्रलय वोडवला अपैसा ॥ ४६ ॥

इंद्रवज्रा नीरांबरामाजि निरंबरा त्या
दैत्येंद्रकांता अति मग्न होत्या
त्या निर्जरांनीं उचलूनि नेल्या
तत्पूर्व कृत्याधिक पीडियेल्या ॥ ४७ ॥

शिखरिणी शरें वातावर्तीं विमतनगरी घालुनि पहा
दिशाप्रांता नेतां गणिति खल संवर्तचि महा
दहाही दिक्प्रांतीं फिरउनि समुद्रीं बुडविली
मयाचे मायेनें पुनरपि नभीं ते उडविली ॥ ४८ ॥

व. ति. सिंधुस्थिता सुरशि(श)रें समरांतरंगा
तों भेदुनि रिपुधनुर्मुकुटांतरंगा
जैसा प्रधान जयवंत नृपानुषंगा
तैसा शरार्य वसवी हरिच्या निषंगा ॥ ४९ ॥

भु. प्र. धनुष्कोटि-कोटीं रसद्रत्न कोटी
प्रभग्नासुरां हांसतां देव कोटी
मयें सूचिलें त्या दितीच्या सुतासी
ससक्रंदना मोहिनी क्रंदतोसी ॥ ५० ॥

इंद्रवज्रा मानी महा तो मुकुटावमानी
मानी असें देखुनि ते विमानीं
दारां न ये त्या अवरोधदारा
दारावया दैत्यकुला उदारा ॥ ५१ ॥

शा. वि ऐसा खेद करूनि भग्नधनु तो त्यागूनि कोपानलें
ज्वालापुंज वमन्मुखें म्हणतसे लक्षूनि इंद्रा सळे
स्त्रीचोरा मर पामरा रत बरा हे दूसरी मोहिनी
आली भोगि म्हणोनि दुर्धर गदा ते प्रेरिली तोलुनी ॥ ५२ ॥

उपजाति त्या दैत्यशस्त्रावरि देवराजें
तैं सोडिलें वज्र अभंग तेजें
गदेस संघट्टुनि तें तृणासें
चुकोनि आलें विधिवाग्विलासें ॥ ५३ ॥

,, म्हणे शची यावरि इंद्र कैंचा
दंभोलिचा हा हतदंभ साचा
विचित्रसेनें मज मोहिनीसें
विलोकणें हें घडलेंच कैसें ॥ ५४ ॥

उपजाति अपाय देखूनि निजप्रभूचा
तो लोटला संघ दिवौकसांचा
ते भीडले स्वायुध-कोटिनेंही
परी गदेतें लवभंग नाहीं ॥ ५५ ॥

व. ति. त्यानंतरें वरुण घालुनि पाश बोढी
दंडी स्वदंडनिकरें यमशक्ति गाढी
ते पाशदंड न गणूनि गदा उदेली
हाहाकृती सुरदळीं बहु थोर जाली ॥ ५६ ॥

शा. वि. आपद्बांधव माधवें तदुपरी ते स्वीय कौमोदकी
कल्पांतोक्षित-वाडवाग्नि-जननी विद्युत्कलेडचा निकी
हस्तें तोलुनि टाकिली अरिगदा लक्षूनिया संभ्रमें
भासे वन्हिमुखांत पूर्ण पडला भूगोल अंतःक्रमें ॥ ५७ ॥

भु. प्र. गदाद्वंद्वयुद्धीं स्फुलिंगौघवृष्टी
बहू जाहली भस्मही भूतसृष्टी
प्रदीप्ताशनीनें महादारुयष्टी
परी दग्धली जाहला दुष्ट कष्टी ॥ ५८ ॥

इंद्रवज्रा
त्यानतर दानवराज जैसा
धांवोनि ये घेउनि चंद्रहासा
तैसाच तो यादव चक्रवर्ती
स्वानंदकी दक्षकर प्रवर्ती ॥ ५९ ॥

उपजाति
दैत्यारि त्या त्यावरि बोलियेला
वरी यथेच्छा वरि दानलीला
करावयालागि तदीय दीक्षा
घे आजि देईन समीकदक्षा ॥ ६० ॥

शा. वि.
माया टाकुनि पातलासि सुकृतें सन्मार्ग आतां धरी
ब्रह्मानंदकर स्वनंदककर स्थापीन तूझें शिरीं
जाला पुत्रकलत्रमित्रविभवव्यापार तूझा पुरा
ध्यातां नित्य पुरा पुरारिपद तूं तो मीच जालों खरा ॥ ६१ ॥

उपजाति
मदीय रौद्राक्ष महाप्रभावें
जीवत्व टाकूनि शिवत्व पावे
घे व्योमकेशत्व ममासिघाईं
महा स्मशानीं भसितांग होई ॥ ६२ ॥

इंद्रवज्रा
ऐसा यदूत्तंस छलोक्तिकोपें
हाणे महादैत्य असिप्रतापें
दाऊनि दोर्लाघव यादवेंद्रें
तो खंडिला खड्ग विनोदसांद्रें ॥ ६३ ॥

त्या नंदकें खंडित चंद्रहासा
देखे रिपूही रविचंद्रहासा
क्रोधें तया दानव कालचक्रा
टाकी विलोकी स्मितदेवचक्रा ॥ ६४ ॥

उपजाति　द्विचक्र दुर्दर्शन येत होतें
सुदर्शनें रोधविलें अनंतें
परस्परें अर्पित ते स्वनांवा
अपूर्व वाटे बहु पूर्वदेवा　　॥ ६५ ॥

,,　स्वचक्रपुष्टीस विचित्रसेनें
आवाहिलें ब्राह्म्य महास्त्र मानें
तदा परब्रह्म मुकुंद तेजें
सुदर्शनाविर्भव होय माजे　　॥ ६६ ॥

,,　उदंड उत्पात नभीं उदेला
मूर्धावरी भूचर-खेचराला
स्थिति प्रसंगीं प्रलय प्रभासे
भये अरि स्तंभपरी उभासे　　॥ ६७ ॥

,,　म्हणे हरी ऐक अरी स्वबोले
अतां तुतें स्थाणु महत्त्व आलें
निर्जीवसा दैत्य अवाच्य जाला
महामहःसिंधुनिमग्न ठेला　　॥ ६८ ॥

शा. वि.　विश्वामित्रसुमंत्रजात अवघे वासिष्ठ दंडी जसें
जालें लीन विचित्रसेन-नगर श्रीविष्णुचक्रीं तसें
होतें कीं नव्हतेचसें दडुनिया प्राभंजनास्त्राथिलें
क्षारांभोनिधिमध्यघोरसलिलीं विध्वंसिलें टाकिलें　　॥ ६९ ॥

उपजाति　विचित्रसेनादि विनाश ऐसा
विचित्र केला न कधींच तैसा
विश्वाभिराम-प्रभु रामबंधू
विशेष शोभे विजयैकसिंधु　　॥ ७० ॥

मालिनी भुवि-दिवि-चरतेन्द्रा(द्भ्रा)दाटले फार हर्षें
जयजयजयघोषें वर्षले पुष्पवर्षें
शतमखमुखदेवीं स्तोत्र अत्यंत केलें
विधि-शिव-सनकांनीं तें अनुश्लाघियेलें ॥ ७१ ॥

उपजाति श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
उल्लास हा अष्टम पुष्ट जाला ॥ ७२ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे विचित्रसेनवधोनाम
अष्टमोल्लासः ॥ ८ ॥

## नवमोल्लास

| | | |
|---|---|---|
| उपजाति | श्रीकांत जाला जयकीर्तिशाली<br>भासे प्रतापें अपरांशुमाली<br>म्हणोनि कीं लाजुनि सूर्य अस्ता<br>पावावया बुद्धि करी प्रशस्ता | ॥ १ ॥ |
| मालिनी | तदनु दनुजहंतानन्ववीता-अहंता<br>भजनजननियंता भक्तदु:खेभयंता<br>सकलकलहकारी संहरी निर्विकारी<br>नमुनि मुनि इभारी नंदवी कैटभारी | ॥ २ ॥ |
| व. ति. | गोपाल सायुध खगासन मन्मथेंसीं<br>येतां नभ क्रमित नैज पुरप्रदेशीं<br>लीलाशुका निरखिलें हरिखें हरीनें<br>पाचारिला बसविला स्वकरीं कृपेनें | ॥ ३ ॥ |
| भु. प्र. | हरिद्राजय श्रीकरें लाभला हो<br>हरिद्रातटीं आमुचा लाभ लाहो<br>वधूनीं असा प्रार्थितां चक्रवर्ती<br>वधूनी द्विषा ये क्षमा-चक्रवर्ती | ॥ ४ ॥ |

भु. प्र. प्रधान-प्रधाना म्हणे शीरपाणी
स्वरथ्यस्वर प्रार्थिती शीतपाणी
निशाणें निशा सिंधुतीरीं उभारा
करानें करा स्वस्थ र(रे ?)यानभारा ॥ ५ ॥

रथारूढ देखोनि त्या अग्रजाला
खग त्यागुनी श्रीहरी अग्र जाला
उडी घालुनी भेटला राम कृष्णा
क्रमें वंदिलें यादवीं राम-कृष्णा ॥ ६ ॥

इंद्रवज्रा कैंचा अनंगासुर वैर कैंचें
पाहा पहा अद्भुत युद्ध त्याचें
वत्सा सुदैवें मज भेटलासी
ऐसें म्हणे राम निजानुजासीं ॥ ७ ॥

वि. शुक सुपर्ण परस्पर हांसती
हलधरासह विस्मय भाविती
हरि म्हणे समयीं शुक सन्मुनी
मज सखा घडला तव दर्शनीं ॥ ८ ॥

उपजाति ऐकोनि पूर्वोत्तर सन्निधाना
चिंतोनिया राम मुनिप्रधाना
म्हणे शुका तो न दिसे प्रसंगीं
देतो बहू भाग्य असें स्वसंगीं ॥ ९ ॥

आतां तदीयाद्वय शोभमाना
लीलाशुका तो बहुमान माना
म्हणोनि रामें श्रितमोदधामें
शृंगारिलें तत्प्रभरत्नधामें ॥ १० ॥

व. ति. वत्सा तवात्मजपणा दृढ शोभवीता
मायान्वितासुरसम प्रतियुद्ध देतां
ऐसें स्मरा स्तउनि राम म्हणे हरीतें
येथें करो स्वजन मज्जन-भोजनातें ॥ ११ ॥

शा. वि. आर्याज्ञापरिपूर्ति हो म्हणत जों तो आर्यसत्ताधणी
तों जाला नवलाव रामजन ते सुस्नात होते-क्षणीं
ज्यां ज्यां प्रीति जशा पदार्थ-भजनीं त्यां त्यां तशा संभ्रमें
शालामंडप भासती चहुंकडे दिव्यान्नपानक्रमें ॥ १२ ॥

" तेव्हां त्या जन जाठराग्नितपनें येतां समस्तोदरीं
संध्या यादवमंडलीसम तुळे दिव्यांगरागें करी
आमोदप्रद माल्यभाभरणही जालें तदाशान्वयें
नंदानंद-पयोधिनंदन-कलानाथ-प्रसादोदयें ॥ १३ ॥

" भुक्तायास तमिस्र लेश जंव त्या लोकीं उदोसा करी
तों तांबूल-सुचर्वणारुणरस श्रीदीपिकाभा धरी
ध्वस्ताशासुरदोःप्रतापकणिकासंदोह पूर्वीं जसा
नाना-वन्हि-विचित्र-यंत्र-गरिमा द्योतोनि नासे तसा ॥ १४ ॥

मालिनी यदुतिलक जयाच्या कीर्तिशा चंद्रज्योती
नगरजनचकोरां दर्शनें तृप्ति देती
भरुनि दशदिशांतें पूर्णिमातेज माजे
अमलकुवलयश्री द्वारकेची विराजे ॥ १५ ॥

शिखरिणी महामाणिक्यांसीं दशशत फणांचे फणिपती
हिलालाचें रूपें हरि-उभयभागीं विलसती
तया तेजासीं त्या अमित महताबा उजळती
गमे रात्रीमध्यें अभिनव रवींदू उगवती ॥ १६ ॥

वंशस्थ
तदा विलोकूनि मनोज्ञ यामिनी
सतीमणी चिंतुनि रुक्मिणी मनीं
पुरप्रवेशा अति आदरी हरी
म्हणे गुणें वोढित रुक्मसोदरी ॥ १७ ॥

भु. प्र.
अशा भावनेशीं यदूत्तंसचंद्रें
सभें शोभतां लोचनानंद सांद्रें
किती वानिती गोपतीच्या रणाला
किती वानिती कामसंग्रामलीला ॥ १८ ॥

अनंगासुराची महा घोर माया
अनंग प्रभू हाच तीतें रमाया
असें वर्णितां मन्मथा यादवांनीं
नृपांतःपुरामोदसंमोद वाणी ॥ १९ ॥

म्हणे तो स्मर श्लाघिजे मागुतीही
स्वपुत्रोत्सवें हो तुम्हांसीं सुदेही
उषानंदनानंद सांगे हरीतें
दिल्हें माधवें फार तोषूनि त्यातें ॥ २० ॥

विभूषांबरें रामकामादिकांनीं
जलांतःपुरींही दिल्हीं बायकांनीं
म्हणे भार अक्रूर हा कोण वाहे
स्वचारां वदे याचकां वांटवा हे ॥ २१ ॥

व. ति.
सानंदनंदतनया तनयाभिरामा
रामानुगा भजति सैंधव सप्रकामा
कामात्मजें विचरिलें मग मज्जनातें
नातें सुख प्रगटलें यदुनंदनातें ॥ २२ ॥

उपजाति पुत्रोदयीं त्या अनिरुद्ध भूपें
स्वकोशिच्या रौप्य-सुजातरूपें
कैलासमेरू दुसरे करूनी
ते वांटिले याचक शोधऊनी ॥ २३ ॥

शा. वि. नानामंगळतूर्यजातरव तो दिक्पांस सांगूं निघे
यानारूढ समग्र यादवबळी जाले प्रभूही तिघे
पाठीं राम दळाग्र काम मिरवे मध्यें हरि स्यंदनीं
सैन्यें चालतिं राजबीदिं विभवें आनंद वर्धे जनीं ॥ २४ ॥

मालिनी सुरवरसरितेशा द्वारका-राजवीथी
विचरुनि विमलत्वें तो बिधी(दी) राजवीधी(ती)
इभशुभरदरौप्यें स्वर्णवर्णा विशाला
लसति तदुभयांगीं शा(सा)र्ध त्या चंद्रशाला ॥ २५ ॥

,, मुरहररथ येतां त्या महामार्गरंगीं
पुरवरवनिता हो तोषल्या अंतरंगीं
हरिपरवशचित्ता व्याज नीराजनाचें
करिति करिगती त्या भाग्य माजें जनाचें ॥ २६ ॥

शा. वि. रत्नोत्तुंग-सहस्रशृंग-विलसन्मेरुस्थ-नीलांबुदा
वोवाळूं जनरीतिनें प्रगटुनी निश्चंचलत्वें तदा
प्रत्येकार्क करीं धरूनि पुढती विद्युल्लता खेळती
ऐसा पौरवधू रथस्थहरितें नीराजतां भासती ॥ २७ ॥

अंतःकच्छधरा सुनाभिविलसन्नीवी-सुवर्णांबरा
स्कंधाक्रांतकुचोत्तरीयरुचिरा धम्मील-भूषाभरा
वक्षोजावृतकंचुका चकचकत्कस्तूरिकाचित्रका
दिव्यांघ्री-कुलनायिका विलसती चित्रारती-दीपिका ॥ २८ ॥

शा. वि. अंत:कच्छकटिस्थगुच्छवसना निश्चोलचोलांगना
चेलांत:प्रतिबिंबितोन्नतकुचा नि:संकुचालोकना
सारक्तारुण-गल्लपाणिचरणा केशप्रबंधोत्करा
रंभोरू उभिया सदंभ-शतधा-कुंभारतीतत्परा ॥ २९ ॥

,, प्रौढा स्वस्तनवैभवा प्रगटि त्या सौवर्ण कांचोळिया
कां प्रत्यङ्मुख ल्यालिया हरि वरूं कीं नोवऱ्या जालिया
ऐशा राजत हंसकार्जितपदा नीराजितां गुर्जरी
कृष्णालोकन निर्निमेष-नयना त्या वाटती निर्जरी ॥ ३० ॥

,, ज्या नामांकित बालचंद्र निटिला कस्तूरिकाकोज्ज्वला
रम्या कामकलाकलापकुशला लोलांतरंगाकुला
लोकासेचनकोन्नतस्तनलसत्सूक्ष्मोत्तरीयांसका
त्या रामानुजबाळिका चमकती कृष्णारती-उत्सुका ॥ ३१ ॥

,, माध्वीमाधव-दर्शनारतर(ल?)ता द्वाराश्रिता देखिल्या
त्या लोकीं स्तनपुष्पगुच्छकलिता हैमीलता देखिल्या
त्यांच्या देखुनि कुंकुमोर्ध्वतिलका सांगारका मन्मना
भासे तन्मुख धांव दीपकळिका उद्भासती सांजना ॥ ३२ ॥

,, लेणीं गुप्त करूं स्वमौळिवरुनी आणीत चेलांचला
पाणिद्वंद्व विराजभाजत महामाणिक्यदीपोज्ज्वला
श्रोणि लंघि विभूषणावलिलसद्वेणी मनोहारिणी
कोण्ही एक विराजती वरमहाराष्ट्रैक-कांतामणी ॥ ३३ ॥

शिखरिणी किती ऐशा कांता लिहुनि बरव्या चित्तफलकीं
सदा ध्येया केल्या हरि सहचरीं धूर्ततिलकीं
जितें जो आसक्त प्रतिपद नमी तोच तिजला
तदीयावस्ता(स्था) तों शिव शिव न वर्णेच मजला ॥ ३४ ॥

शा. वि. हर्म्यस्था नगरांगना सुनयना वातायनें पाहती
त्यांच्या दृष्टिसितासितारुणरुची पार्श्वद्वयीं फांकती
तेणें पल्लवतोरणें विलसतीं पद्मद्वयेंदीवरें
ते देखोनि उठावती रसिकदृक्शोभालि लीलाभरें ॥ ३५ ॥

स्रग्धरा लाजापुष्पांजली त्या उडविति उडुशा(सा)मार्ग आकाश भासे
चाले लीलें शतांग क्षितिधरवरसा स्वर्णवर्णी विलासे
त्याच्या राजत्पताका उपमति लतिका घंटिका गर्जितांसी
शोभे भूषा तटि(डि)त्वात् हरि हरिखति ते पौरवर्ही
प्रियासीं ॥ ३६ ॥

शा. वि. क्रीडेनें रमऊनि लोककुशला रंभा जिहीं हिंसिली
विद्येनें उरु थोरल्या वश करी ते उर्वसी त्रासिली
लावण्यास तिलोत्तमा तिळ तऱ्ही ज्यांसी नव्हे उत्तमा
त्या त्या शोभति पौरवारवनिता दावीत नाटचक्रमा ॥ ३७ ॥

,, दिव्योत्तुंग मृदंग ते धिमिधिमि ध्वानोत्करें वाजती
वीण्यासीं स्वरमंडलें रुणुझुणु श्राव्यस्वरें माजती
थैथैकार उठावती नटगणीं तालध्वनी गाजती
गाती गायक रागरंग खुलती नाटचें नटी राजती ॥ ३८ ॥

,, कोठें नादुनि ठाकती ठमकती कोठें उडी दाविती
कोठें घालिति लागलाग न कळे कोठें हळू डोलती
कोठें हांसति बोलती अभिनयें कोठें सुधी मोहिती
यारीतीं रमणीय वारवनिता कृष्णोत्सवा बाहती ॥ ३९ ॥

,, श्रीकृष्णा मधुराधरैकरसिका वेणीविहारा हरी
श्रीमच्चोलविलासिका मिरवसी मध्यस्थ कांचीपुरी
सर्वव्यापक होउनी निवससी कांतोरु-देशांतरीं
कीं ह्या दाखविशी विभूतिमहिमा कामोपदेशें करी ॥ ४० ॥

उपजाति बोधूनिया सांग अनंगतत्त्वा
निजत्व देशी विरहार्ज(हीज)ना त्वां
ऐसी तुझो हे श्रुतिसेव्य लीला
गातों म्हणोनी नटतां निवाला ॥ ४१ ॥

मालिनी तळपविति तनूतें भूषणातें अनेका
झळकविति चुड्यांसीं पाणिमुद्रांगुळीका
चमकविति कुचांसीं हार लीलाविहारें
धमकविति मनातें पाहत्यांच्या निडारें ॥ ४२ ॥

शा. वि. घामें बारिक कंचुकी लिगटतां स्वांगा जगन्मोहना
हारां नीट करी तसींच पदरें झांकीत कांहीं स्तनां
हस्तें दावित भावशा पुसित त्या सस्वेदबिंदुमुखा
ताटंकोज्ज्वलकर्णचुंबिनयना देती कशा कीं सुखा ॥ ४३ ॥

,, श्रृंगारोदयश्रृंगिश्रृंगविलसच्छ्रीकामचंद्रोदयें
तल्लावण्यललामसिंधुलहरी कीं लोटताती स्वयें
किंवा कृष्णघना घनें तळपुनी विद्युल्लता खेळती
ऐशा लोकमनीं मनोहर नटी त्या नाचतां भासती ॥ ४४ ॥

मालिनी मदनजनक मोहूं मोडिती लोचनातें
गमत अतनुपाशें बोढिती तन्मनातें
सकळविकळसा हा सर्वथा होयिना कीं
म्हणुनि नवलतेनें ठेविती बोट नाकीं ॥ ४५ ॥

स्मरुनि विभुशठत्वा त्या स्मरार्तातिरंगा
अभिनयकपटानें तोलिती उत्तमांगा
दशनवसनदंशें दाविती कीं स्वरागा
परि हरि वश जाला भीमकन्यानुरागा ॥ ४६ ॥

शिखरिणी समारंभें ऐशा कनकशिबिकारूढ ललना
समूहेंसीं येतां यदुपति निजोद्दामसदना
उषा-सद्मीं जाली मुदित नरनारी निबिडता
प्रपौत्रा देखोनी हरि हरिख मानी सवनिता ॥ ४७ ॥

स्वागता इंदुवारवर इंदु उदेतां
इंदुमौळिनवसें शिशु होतां
इंदुशेखर अशा अभिधानें
इंदुवंशमणि आळवि मानें ॥ ४८ ॥

स्वागता त्यावरी द्विजसमूह मिळाला
जातकर्मविधि सर्वहि केला
काम दान करि धान्यधनानें
होय रुद्ध अनिरुद्ध मुखानें ॥ ४९ ॥

,, रुक्मिणीरतिस देखुनि तेथें
तत्पदार्थच भजूं यदुनाथें
भीमकीमणिमनोहरधामा
मांडिलें गमन बोधुनि कामा ॥ ५० ॥

उपजाति गेली स्थळास प्रिय भीमकन्या
जातेक्षणीं त्या इतरा अधन्या
निजालया पावलिया सतृष्णा
तों देखती स्वस्वगृहांत कृष्णा ॥ ५१ ॥

मालिनी अभिनव घनलीलाकार लावण्यराशी
प्रगटुनि हृदयींचा आपुलाल्या घराशीं
प्रगटुनि हृदयींचा बाह्य आला म्हणोनी
विनविति फळलें कीं पुण्य ऐसें गणोनी ॥ ५२ ॥

उपजाति सर्वत्र संवेष्टित चित्कलापा
कृष्णांकितामध्यगतेंदुरूपा
सभोंवत्या स्त्रीगणचंद्रशाला
विराजवी माधव मध्यशाला ॥ ५३ ॥

इंद्रवज्रा संपूर्ण जों लां(वां)छित कृष्णकांता
क्रीडाभरें किंकिणीनाद होतां
भैमी मनीं भाउनि घोषशंका
हर्म्यांगणां ठाकत निष्कलंका ॥ ५४ ॥

उपजाति रागानुरागा मणितांकवीणा
गुणोत्सुका त्या सुरतप्रवीणा
येतां तशा बाह्य अनंत लीला
मर्दे स्मरेभ स्फुट मोकलीला ॥ ५५ ॥

मालिनी यदुवर निजकांतारूप कासार शोभे
रतिरससुख सेऊं काममत्तेभ लोभें
स्मितमुख-पद-हस्तांभोज-वक्षोजकोशीं
करि हरि करिलीला मग्न तत्तत्प्रदेशीं ॥ ५६ ॥

उपजाति पद्मावरी इंदु असे स्वभावें
परंतु इंदूवरि पद्म भावें
विकासतां थोर विचित्र जालें
कृष्णाबलांनीं प्रबलत्व केलें ॥ ५७ ॥

परस्परालिंगन चुंबनानें
विचित्रबंधांत रतोत्सवानें
सोळा सहस्त्रावरि आठ कांता
भोगूनिही तृप्ति नसे अनंता ॥ ५८ ॥

इंद्रवज्रा
चंद्रोपलीं निर्मित चंद्रशाला
बाह्यांगणीं चंद्रमुखी सुशीला
चंद्रान्वयांभोनिधिचंद्रसंगें
चंद्रोदयीं क्रीडति सांद्रभोगें ॥ ५९ ॥

,,
प्रत्यंगनेतें प्रति कृष्ण जाला
सर्वत्र संपूर्ण विलास केला
साश्चर्य ते लक्षिति एकमेकें
आनंदतीही रमती विशंकें ॥ ६० ॥

,,
ऐसाच सर्वात्मक सर्व लोकीं
श्रीराजगोपालविलास जो कीं
आविर्भवें भक्त-सुचित्त-सौधीं
तो द्योततो श्यामकवींद्र बोधी ॥ ६१ ॥

,,
हा राजगोपालविलास मातें
दे आख्यानें नवव्या क्रमातें
तैं श्यामराजात्मनिवेदनातें
ये देव-भक्तांतर-ऐक्य नातें ॥ ६२ ॥

उपजाति
श्रीराजगोपालविलास नांवें
केलें महाकाव्य तयाच देवें
निमित्त त्या श्यामकवींद्र केला
उल्लास पूर्ता नववा उदेला ॥ ६३ ॥

शा. वि.
मेघश्याम जयास सद्गुरु सदा श्रीराम भक्तीच ज्या
खंडो त्र्यंबक तात ज्यास जननी गोविंदतातात्मजा
ज्याचें गौतम गोत्र जो स्वजननें वाराहवापी स्तवी
श्रीगोपालविलास काव्य वदला तैं श्यामराजा कवी ॥ १ ॥

॥ इति श्रीराजगोपालविलासे महाकाव्ये नवमोल्लासः ॥ ९ ॥

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

# शब्दार्थ व टीपा

जाड व बारीक टाईपातील आकडे अनुक्रमे श्लोकक्रम व चरणक्रम दर्शवितात.

## प्रथमोल्लास

**कथाभाग :** विष्णूस व सरस्वतीस नमन – संतांस व ज्ञानी लोकांस केलेली विज्ञापना – मन्नारगुडी-क्षेत्र माहात्म्य – कृष्ण व मनोरमेची दृष्टिभेट – मनोरमेच्या मनात निर्माण झालेले कृष्णप्रेम – कृष्णाचा विरहताप – कृष्णदूत शुकाचे मनोरमेकडे प्रयाण.

१. **जगज्जननादिककारणा** – उत्पत्ती, स्थिती आणि लय यांचे कारण असणारा विष्णू. **पयोब्धि०** – क्षीरसागर हे ज्याचे सुंदर निवासस्थान आहे असा विष्णू.

२. **भोगीशान** – (भोगी=साप, ईशान=स्वामी) शेष. **मुकुळल्या** – मिटलेल्या. १–२. शेषावर शयन करणारा, चंद्र व सूर्य हे ज्याचे डोळे आहेत अशा तुझ्या (म्हणजे विष्णूच्या) कृपादृष्टीने माझा स्वीकार केल्यास मी भाषेला नटीप्रमाणे अलंकृत करीन.

४. **धर्मादिपुमर्थ** – धर्म, अर्थ, काम व मोक्ष हे चार पुरुषार्थ. **शुक** – वस्त्र **गद्याद्यनवद्य** – (गद्यादि+अनवद्य) गद्यादी निर्दोष.

५. माझा काव्यप्रबंध हा लोहरूप असून त्याला संतरूपी परिसाचा स्पर्श होताच तो सुवर्णमय होईल.

७. मोक्ष देणाऱ्या सात प्रसिद्ध क्षेत्रांमध्ये क्रमाने सातवी असणारी द्वारका. पुण्यक्षेत्र म्हणून ही स्वर्गापेक्षाही श्रेष्ठ आहे.

**सात पुण्यक्षेत्रे :** 'अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका । पुरी द्वारावती चैव सप्तैता मोक्षदायिकाः' येथे 'द्वारका' म्हणजे 'दक्षिण–द्वारका'. तंजावर जिल्ह्यातील मन्नारगुडी ह्या क्षेत्रास 'दक्षिण – द्वारका' म्हणतात. येथील कृष्ण हा 'राजगोपाल' या नावाने विख्यात आहे.

३–४. **तुलना** : रघुनाथपंडितकृत 'दमयंती–स्वयंवर' श्लो. १६३.

८. **गोभिल, गोप्रलय** – हे दोन्ने बंधू विष्णुभक्त असून यांच्या तपामुळे श्रीकृष्ण गोपालरूपाने मन्नारगुडीत अवतीर्ण झाला, अशी कथा आहे. **शिराणी** – हौस, आवड.

९. **विबुधाढ्यमेरू** - पर्वतांत मेरुपर्वत श्रेष्ठ, त्याप्रमाणे देवांत श्रेष्ठ असणारा राम. या ठिकाणी 'अनंत' व 'मेरू' ह्या शब्दांद्वारे 'अनंत मौनी' व 'मेरुस्वामी' यांचा अप्रत्यक्ष निर्देश केला आहे असे वाटते.

१०. **श्रीराजित** – वैभवसंपन्न. **राजराजनगरी** – तंजावर. चोल घराण्यातील प्रसिद्ध राजा 'राजराज चोल' (इ. स. ९८५–१०१३) याच्या नावाने ही नगरी ओळखली जाते. चालुक्यांनी उध्वस्त केलेले तंजावर शहर यानेच पुन्हा वसविले. **भूमिवृंदारक** – भूदेव, ब्राह्मण.

११. **स्वहेमप्राकारीं** – त्या नगरीच्या सुवर्णमय कोटावर. **स्वनद्यंत्राकारें** – (स्वनत् + यंत्राकारें) तोफांच्या आवाजामुळे. **द्युमणि** - सूर्य. **विकळसें करी** – निस्तेज करी.

३–४. राजवाड्याचा झगमगणारा रत्नमय कळस आपल्या तेजाने दुपारच्या सूर्यासही निस्तेज करीत असे.

१२. **परिखा** – खंदक. **व्यालोल** - चंचल. **विमतां** – शत्रूंना. **सुरभिद्बलानीं** – असुर सैन्याने.

१३. **पत्ती** – पायदळ. **वाहिनी** – सैन्य. **घनरस** – पाऊस. **पुरांचा वैरी** – त्रिपुरारी शंकर.

३–४. ह्यातील वर्णन मंदिरातील देवदासींच्या नृत्याला अनुलक्षून आहे.

१४. **चित्रसदनें** – विविध प्रकारची सुंदर घरे. **सहस्रमुख** – शेष. **वीथी** – मार्ग. **कमला** – पाणी.

१५. **सनकमुखमुनींद्रीं** – सनकादिक श्रेष्ठ ऋषींनी. **चंपकारण्य** – मन्नारगुडीच्या आसमंतातील प्रदेशाला असलेले नाव.

१६. **सरिता हरिद्रा** – हरिद्रा नदी. मन्नारगुडीतील राजगोपालमंदिराजवळ असलेल्या एका विशाल तलावास 'हरिद्रा नदी' ह्या नावाने संबोधले जाते. ह्या तलावाच्या मध्यभागी वेणुगोपालस्वामीचे (कृष्णाचे) एक छोटेसे देऊळ आहे.

हरिद्रा नदीत असंख्य कमळे होती. यावर तिने पद्मरूपी नेत्र सर्वांगावर धारण केले होते अशी कल्पना केली आहे. ह्या नदीचे इंद्राशी साम्य कल्पिले आहे. कारण इंद्र हाही 'सहस्राक्ष' आहे. (त्या नदीने तो सुंदर प्रासाद पाहाण्याकरिता जणू पद्मरूपी सहस्र नेत्र धारण केले होते, हा भाव येथे सूचित होतो.)

१७. **धनेशपुर** – कुबेराची अलकानगरी.

३–४. उगवणारा सूर्य आणि अस्तास जाणारा चंद्र यांची किरणे मेघांवर पडल्यामुळे ते शोभिवंत दिसत, हा भाव.

१९. **रथ्यांतरीं** – मार्गात. **लीलाविहारकपटें** – क्रीडेच्या मिषाने.

२१. ३. नीलमेघाप्रमाणे श्यामल व सुंदर अंगकांतीचा कृष्ण विजेसारख्या तेज:पुंज व सळसळणाऱ्या पीतांबराने विराजत होता.

२२. **मदनजनक** – मदनाचा (प्रद्युम्नाचा) पिता कृष्ण. प्रद्युम्न हा पूर्वजन्मीचा मदन असून शंकराने त्यास जाळल्यावर त्याने पुढे रुक्मिणीच्या पोटी जन्म घेतला. (श्रीमद्भागवत, अ. १०–५५) **पक्ष्म** – पापण्या. **घटित करुनि** – लावून.

२३. **त्रिशुद्धी** – त्रिवार, निश्चित.

२४. **चेटिका** – दासी.

२५. **त्वंगत्** – दौडणारा. **तुंग** – उंच. **तुरंग** – घोडा. पहिल्या चरणात 'तिलकें' ऐवजी 'तिलक' असे मुळात असावयास हवे.

१–२. वेगाने दौडणाऱ्या उंच घोड्यावर बसलेला कृष्ण कधी सावकाश, कधी वेगाने तर कधी वर्तुळाकार गतीने मार्ग आक्रमीत असता.

२६. **रसिकेंद्रराणी** – कृष्णाच्या सैन्यात असलेल्या 'रसिकेंद्र' नामक एका अधिकाऱ्याची पत्नी. **हर्म्यांतरीं** – अंत:पुरात, प्रासादात.

३–४. श्रीकृष्णाने घोडा वर्तुळाकार फिरविला असता त्याच्या दृष्टीपुढे रसिकेंद्रराणी झळकली. मदनास मांगल्य आणणारी 'स्नेहवती,' 'गुणवती'

दीपिका अंत:पुरात प्रस्फुरण पावावी, त्याप्रमाणे ही सुकेशी कृष्णाच्या अंत:करणात तळपून गेली. कृष्णाच्या मनात कामभाव जागृत करती झाली, हा भाव. 'स्नेहवती' व 'गुणवती' यांवर श्लेष आहे.

२७. **खेलन्मणिमालिनी** – हलणारी रत्नमाला गळयात धारण करणारी. **चपल०** चंचल नेत्रकटाक्षांनी लोकांना पाशात ओढणारी. **कल्लोलिनी** – नदी. **क्लेशाब्धिसंतारिणी** – दुःखरूपी सागरातून तारून नेणारी. **डोल्हारा** – झोका, हिंदोळा.

२८. **शौरींगितें** – कृष्णाच्या संकेतामुळे. **विधानीं** – कृतीने.

२. मनोरमा ही कृष्ण (तात) व मदन (सुत) यांच्या संघर्षास कारणीभूत झाली.

२९. **मकरांकचित्ता** – मकर हे ज्याच्या निशाणावरील चिन्ह आहे अशा मदनाच्या मनाला.

असुर असलेल्या सुंदोपसुंदांनी आपसात भांडावे हे स्वाभाविक आहे; पण धर्मरक्षण करणारे देव हे तरी कुठे कलहमुक्त आहेत? पितापुत्राचा संघर्ष ह्या विलासिनीच्या निमित्ताने उत्पन्न झाला, या घटनेस अनुलक्षून.

सुंदोपसुंद हे निकुंभ दैत्याचे मुलगे असून तिलोत्तमेसाठी त्यांनी परस्परास ठार मारले अशी कथा आहे. (महाभारत आदि. अ० २०९–२१२)

३०. **शाङ्र्गकार्मुक** – शिंगाचे धनुष्य. **अभ** – तेज. **सांगकवची** सर्वांगावर कवच धारण करणारा. बळकट असे शिंगाचे धनुष्य, वज्राप्रमाणे तेज:पुंज असणाऱ्या बाणांचा समुदाय व ब्रह्मयाचे महान अस्त्र बाळगणारा, कवचाने संरक्षित असा बलवान श्रीकृष्ण आहे. त्यास माया, मोह ही भ्रामक अस्त्रे धारण करणारा काम, कृश स्त्रीचे भ्रुकुटीरूपी धनुष्य सज्ज करून तिच्या नयनप्रांतांतून सोडलेल्या बाणांनी कसा बरे जिंकू शकेल ?

३१. १–२. मनोरमा हे तिचे नाव. ती मनात रमणारी आहे. मदनही मनातच उद्भवणारा आहे. (मदनाला 'मनोज' असे नाव आहे.) म्हणून त्याला ती सेव्य आहे.

३–४. 'मनोरमा' यातील 'रमा' (लक्ष्मी) या पदामुळे विष्णूचाही तिच्यावर हक्क पोंहचतो. याप्रकारे मदन व श्रीकृष्ण यांचा तिच्यासंबंधीचा घडलेला व्यवहार होय.

३२. विमानातून विहार करणाऱ्या सिद्धांनी मदनाच्या कार्यास वाईट म्हणून संबोधले. तेव्हा मदनाने विवेक केला. एक तर वडिलांना विद्ध करावे किंवा पळून तरी जावे. या दोन मार्गांपैकी त्याला एकही मार्ग प्रशस्त वाटला नाही. म्हणून त्याने संयम राखला.

३३. **अस्त्राथिला** – अस्त्रांनी युक्त असलेला. **विशिखासन** – धनुष्य. **आकलित** – ओढलेला. **आशुग** – बाण.

३४. **नाराच** – बाण. **कैटभारी** – ( कैटभ, अरी ) कैटभ राक्षसाचा वध करणारा, कृष्ण. **मनोनंदन** – मनात निर्माण होणारा मदन.

३५. कृष्णाच्या मुखचंद्रास पद्मरूपी बाणाने जिंकले. यामुळे चंद्र आणि कमल (सूर्यविकासी) यात अद्यापी वैर आहे. पद्म हे मदनाच्या पंचबाणांपैकी एक आहे. मदनाचे पंचबाण : 'अरविंदमशोकं च चूतं च नवमल्लिका । नीलोत्पलं च पंचैते पंचबाणस्य सायका :'

३८. **विरहार्क बारा** – धातु, मित्र, अर्यमन्, रुद्र, वरुण, सूर्य, भग, विवस्वत्, पूषन्, सवितृ, त्वष्टृ व विष्णु असे बारा आदित्य मानले आहेत.

३९. **दिनावसानीं** – संध्याकाळी. वारुणदिग्वधूटी – पश्चिम दिशारूपी तरुण स्त्री.

४०. **माध्वी** – मालती.

४१. वसंताला 'माधव' म्हणतात. विधु ( चंद्र ) हे विष्णूचेही नाव आहे. म्हणून वसंत ऋतु व चंद्र मित्रप्रेमाने कृष्णभेटीस आले; परंतु त्याला ते शत्रुवत् वाटले. वसंत ऋतु व चंद्र यांमुळे विरहावस्था अधिक तापदायक होते, या संकेतास अनुसरून.

४२. कृष्ण हा चंद्रवंशातला; पण विरहव्यथेमुळे चंद्र त्यावेळी आल्हाददायक वाटला नाही. वसंताला 'मधुमास' असेही म्हणतात. कृष्ण हा मधुदैत्याचा वध करणारा. तेव्हा त्याला वसंतऋतु कसा बरे आवडेल ?

४३. **शीकर** – तुषार. **ईश्वर दक्षिणेचा** – दक्षिणेचा स्वामी यम.

## द्वितीयोल्लास

**कथाभाग :** शुकाचे मनोरमेच्या प्रासादशिखरावर उतरणे – मनोरमेचे सख्यांस विरहदुःखकथन – शुक व मनोरमा यांचा संवाद – त्यातून व्यक्त झालेली कृष्णमनोरमेची परस्पराविषयीची ओढ – मनोरमेची कृष्णभेटीची इच्छा – गरुडावर आरूढ होऊन मनोरमेचे कृष्णाकडे येणे – कृष्ण-मनोरमा-भेट.

१. १–२. श्रीकृष्णाच्या हातरूपी रत्नजडित पिंजऱ्यातून मुक्त झालेला पक्षी (पत्री) शिंगाच्या धनुष्यातून निघालेला जणू बाणच (पत्री) वाटत होता. 'शाङर्ग' हे कृष्णाचे धनुष्य होय.

३. १. अमावास्येच्या अंधाऱ्या रात्री तारकांच्या समुदायात.

४. **मंजुभाषिणी** – मनोरमेच्या सखीचे नाव.

५. तुला दुःख करण्यास तसे सबळ कारण नाही. तुला जसे अकस्मात व अनपेक्षितरीत्या त्याचे विरहदुःख प्राप्त झाले, तसेच त्याच्या प्राप्तीचे सुखही तसेच अनपेक्षित व आकस्मिकरीत्या प्राप्त होईल. म्हणून तू निर्धास्त रहा.

६. कृष्णाशिवाय क्षणभरही जिवंत राहणे मला कठिण झाले आहे. पण तो करुणाकर व दयाघन आहे. यामुळे तो लवकर प्राप्त होईल या आशेवर मी कशी तरी जगत आहे, असा भाव.

९. ३. कपाळास लावलेल्या कस्तुरीलेपाच्या संदर्भात हे वर्णन आले आहे.

१०. **नीलकंठ** – मोर. **जिणोनी** – जिंकून.

११. **कृष्णवर्त्म** – अग्नी.

१. वारा हा अग्नीचा मित्र असल्यामुळे तो मला वज्राप्रमाणे तापदायक वाटतो.

'कृष्णवर्त्म' यात 'कृष्ण' तर हरिचंदन या शब्दात 'कृष्ण' या अर्थाचे पद आले आहे.

१२. **मातृभिद् भार्गव** – मातृहत्या करणारा परशुराम. जमदग्नी व रेणुका यांचा हा पुत्र असून वडिलांच्या आज्ञेवरून याने आईचा वध केला, अशी कथा आहे. (श्रीमद्‌भागवत, ९–१६)

३–४. मदनाला मनोरमेपायी होणारे पित्याचे दुःख जाणवले. म्हणून त्याने मातृहत्या करणाऱ्या परशुरामाला मनात आठवून – पर्यायाने त्याचे उदाहरण डोळ्यांसमोर ठेवून – मला छळावे हे योग्यच होय !

१४. **वृष्णितिलकीं** – वृष्णिकुलातील श्रेष्ठ अशा कृष्णावर. **मुराराती** – (मुर + अराती) मुर दैत्याचा शत्रू, कृष्ण.

२१. **सुवर्णरंभाफळ** – सोनकेळे.

२२. **रंभाफळ** – १. केळे २. रंभा ही अप्सरा.

३–४. रंभा ही शुकाचार्यास मोहित करू शकली नाही, हा संदर्भ येथे अभिप्रेत आहे.

२३. **साधुविवेकसांद्रा** – सुविचारी शुकास.

२७. कृष्ण यमुनेच्या पात्रात क्रीडेसाठी गेला असता कालिय नागाने त्यास आपल्या घरी नेण्याचा प्रयत्न केला. तेव्हा गरुडाने भयंकर कोलाहल मांडला. त्यास भिऊन कालियाने स्वतःची कन्या व चूडामणी कृष्णास अर्पण केला. कृष्णाने तोच मणी माझ्या गळ्यात बांधला.

मण्यासंबंधी दोन कथा आढळून येतात.

१. भागवतात स्यमंतक मण्याची कथा आली आहे. सत्राजिताला हा मणी सूर्यापासून प्राप्त होतो. पुढे जांबवानाने व सत्राजिताने आपल्या कन्या अनुक्रमे जांबवती व सत्यभामा आणि स्यमंतक मणी कृष्णास अर्पण केल्याचा उल्लेख आहे. हा मणी कृष्ण सत्राजिताला परत करतो. व सत्राजिताचा वध झाल्यावर कृष्ण तो मणी अक्रूराजवळ ठेवतो. कृष्णाजवळ अर्थात् स्यमंतक मणी नसतो. (श्रीमद्‌भागवत, १०–५६)

२. मण्यासंबंधी दुसरीही एक कथा उपलब्ध आहे. देव आणि असुरांनी मिळून समुद्रमंथन केल्यावर त्यांनी मंथनाकरिता वापरलेला दोर पृथ्वीवर टाकला. त्या दोराने पृथ्वी दुभंगली व तिच्या आत असलेला मणी

पाताळात गेला. तेव्हा तो शेषाने मस्तकी धारण केला. पुढे गरुडात आणि शेषात वैर उद्भवले. शेषाने तो मणी सुरक्षित राहावा म्हणून कृष्णास दिला. हाच कौस्तुभ मणी होय. (कृष्णयाज्ञवल्कीकृत कथा-कल्पतरु, उत्तरार्ध, दा. सा. यंदे, पृ. ३३८–३३९)

ह्या रूढ कथांच्या आधारे कवीने येथे एक निराळीच कथा कल्पिलेली आहे.

३०. **मनोभिरामा** – चित्ताकर्षक. **मुखरिणी** – मुख्य.

३२. **मणिताटंककलनें** – मण्यांनी युक्त अशा कानांतील दागिन्यांच्या मंजूळ ध्वनीने. सोमान्वयमणि (अन्वय = वंश) चंद्रवंशातील श्रेष्ठ पुरुष, कृष्ण.

३४. ३–४. नगराच्या रक्षणाचे रात्रीचे काम आळीपाळीने देण्यात येत होते असे दिसते. (पुढे श्लोक ३६ यात पाळीचा उल्लेख आहे) या वेळेस ते एका महिन्याकरिता रसिकेंद्राकडे आले होते.

३५. **कामास यतां** – उपयोगी पडता. संग्रामशूराह्वय– (संग्रामशूर, अह्वय= नाव) 'संग्रामशूर' हे नाव किंवा पदवी.

३९. **तार्क्ष्य** – गरुड पक्षी. **पत्रिधुरीण** – पक्षीश्रेष्ठ शुक.

४०. **रविसूतबंधू** – सूर्याचा सारथी अरुण, त्याचा बंधू गरुड.

४२. **मराळगती** – जिची चालण्याची पद्धती हंसासारखी आहे अशी मनोरमा.

४३. **चेलांचल** – पदराचे टोक.

४६. मनोरमेच्या अंतःकरणातील घननीळ कृष्ण गळ्यातील नीलमण्याच्या रूपाने प्रकट होऊन जणू ध्यानस्थ बसला आहे. मेघात वीज वास करते; पण येथे तर नेमके उलट घडले आहे. वीजेप्रमाणे कांतिमान व सुवर्णांगी मनोरमेच्या अंगावर हा नीलमणी ढगाप्रमाणे भासत होता.

५०. गरुडाच्या खांद्यावर बसलेली ती सुंदर स्त्री शुकास सत्यभामेप्रमाणे वाटली कृष्ण सत्यभामेसह गरुडावर आरूढ होऊन नरकासुराशी लढण्यास निघाल होता, हा संदर्भ येथे अभिप्रेत आहे. येथे कृष्ण जरी प्रत्यक्ष नसला तरी तिच्या अंतःकरणातील कृष्ण जणू तिच्याबरोबर आहे असा त्यास भास झाला. भाव तसा भास हेच खरे.

५१. **उद्भट** – चांगला.

५२. **जवोत्कर्ष** – प्रचंड वेग.

५४. **शकुनेंद्र** – पक्षीश्रेष्ठ गरुड.

३. उजवा बाहू फुरफुरल्यास सुंदर स्त्रीची प्राप्ती होते, असा संस्कृत साहित्यातील संकेत आहे. "वामेतरभुजस्पंदो वरस्त्रीलाभसूचकः"

५५. **ध्वजयवाब्ज** – कृष्णाच्या तळपायावरील ध्वज, जव व कमळ ही चिन्हे. श्रीमद्भागवतात कृष्णाच्या तळपायावरील ध्वजा, कमल, वज्र, अंकुश, यव या चिन्हांचा उल्लेख आहे. पहा : "पदानि व्यक्तमेतानि नंदसूनोर्महात्मनः। लक्ष्यन्ते हि ध्वजाम्भोजवज्राङ्कुशयवादिभिः"॥ १०–३०–२५.

५६. १. कुणालाही तर्जि (सं. तर्जनं–ना = धमकी देणे) न देताही पहिल्या बोटास तर्जनी म्हणण्याचा प्रघात आहे.

५७. **रथांगपाणी** – चक्रपाणि कृष्ण.

५९. गरुड हा पंख असलेला पर्वत व त्यावर आरूढलेली मनोरमा ही अलंकार–रूपी पुष्पांनी बहरलेली सुवर्णाची वेल होय असे नगररक्षकांना वाटले.

६०. **भुजंगारि** – गरुड. **भुजंगांतिका** – (भुजंग, अंतिका) प्रियकराजवळ.

६३. **भूरुहवृंद** – वृक्षांचा समूह.

६५. **पाटपाणी** – पाण्याने भरलेले कालवे.

६६. **मनोरमा** – मनाला मोहविणाऱ्या कृष्णाला.

६८. **मधुपलीला** – चुंबनक्रीडा.

० ० ०

## तृतीयोल्लास

**कथाभाग** : क्रीडागिरीची निसर्गरम्यता – क्रीडाशैला-वरील सौधाचे ऐश्वर्य – कृष्णमनोरमेचा प्रणयसंवाद–कृष्ण-मनोरमा-मीलन – मनोरमेचे स्वगृही परतणे.

१. **श्रीगोपति** – कृष्ण. **वररत्नसानू** – श्रेष्ठ रत्नांनी विभूषित (क्रीडागिरीचे) शिखर. **क्रीडागिरी** – विलासाकरिता सज्ज केलेला कृत्रिम पर्वत. संस्कृत साहित्यात 'क्रीडाशैला'चा उल्लेख अनेक काव्यातून येतो. "क्रीडाशैलः कनककदलीवेष्टनप्रेक्षणीयः" मेघदूत, उत्तरमेघ, श्लो० १४.

२. **पटीर** – सुंदर. **पूगो** – सुपारी. **कपित्थ** – कवीठ.

३. **विभावरी** – रात्र. मेघांच्याही वर ज्याचे शिखर पोंचलेले आहे अशा त्या क्रीडाशैलावर रात्र कधीच होत नसे. कारण शिखरावरील रत्नजडित सुवर्णलतांचा व ढगांतील विद्युल्लतेचा प्रकाश यांच्या संगमामुळे रात्री सूर्यासारखाच प्रकाश पडत असे.

४. **जातरूप** – सोने.

५. **नभसत्तटाकी** – आकाशरूपी सुंदर तलावात.

कृष्णाच्या सामर्थ्यामुळे आकाशरूपी सुंदर तलावात तारकांरूपी कळ्यांसह चंद्ररूपी कमल हासत आहे. चंद्राचा अमृतरसरूपी मकरंद सेवन करण्याकरिता कलंकरूपी भुंग्यांनी तेथे कायमचे वास्तव्य केले.

६. **कल्हार** – शुभ्र कमल.

७. **सतटित्कालांबुवाह** – वीजेसहित काळा मेघ.

३–४. मनोरमेसह कृष्ण विहार करीत असता मोरांना वीजयुक्त मेघाचा भास होऊन ते आनंदाने नाचू लागले.

८. **वेघुनिया** – चढून.

९. **वेदिका** – ओटा. **वासवादिकां** – इंद्रादिकांना.

१०. **आयत** – रुंद. **एकैक देशाश्रया** – एका एका विभागाच्या आधाराकरिता. **सदट** – मजबूत, घट्ट. **बारंगा** – सज्जा. **किलच्या** – तुळईवर आडव्या टाकलेल्या लाकडी फळ्या.

११. **विरंची** – ब्रह्मदेव. **विमान** – प्रासादाचे शिखर. पहा : 'असमाना जीचे सौध-विमाना,' द. स्व. श्लो० ९१.

१२. **खेचरवर** – देवश्रेष्ठ.

१४. **रवींदु०** – सूर्य आणि चंद्र हे ज्याचे डोळे आहेत असा देवश्रेष्ठ कृष्ण.

१६. **धूपशकल** – धूपवर्ति. जेवणानंतर ओढावयाची एक प्रकारची सुगंधी विडी. संस्कृत साहित्यात याचा उल्लेख आढळून येतो. पहा, बाणभट्टकृत कादंबरी, संपा. मो. रा. काळे, पृ. ३३.

१७. **करालंबिती** – हात पुढे करतात. **महेंद्रस्थितो** – इंद्राप्रमाणे,

१८. **स्वर्णोल्लसत्‌शृंखला** – सोन्याच्या चकाकणाऱ्या साखळ्या. **श्रीकांतसन्मानसा**– कृष्णाच्या चांगल्या मनाला.

२२. **मधुपूर्णपात्रें** – मद्याने भरलेली भांडी.

२३. ४. रुक्मिणीने अन्नपदार्थ पाठवून दिले. म्हणून मनोरमा तिच्या सुस्वभावाची वाखाणणी करीत आहे.

२४. **भृत्यार्पिल्या** – सेवकांनी दिलेल्या.

२५. **चिंतामणि०** – चिंतामणी जडविल्यामुळे चमकणाऱ्या पादुका. **स्मरभरें** – मदनाने भारलेला.

२६. १. त्या झोपळचास एक गुप्त कळ होती. यामुळे त्यावर बसल्याबरोबर तो आपोआप हालत असे.

२७. **मर्यादेचे कुसुमपडदे** – एकांताकरिता सोडलेले फुलांचे आडपडदे. **चतुरमुकुटोत्तंस** – विद्वानांना भूषणभूत असा.

२९. **श्रुत्युत्सव** – कानांना होणारा आनंद.

३०. **सूज्ञकिरीटहीरा** – विद्वानांचा मुकुटमणी.

३१. **गानकला प्रपंची** – गायन करू लागली. **आहरीनें** – गायनाच्या प्रयोगाने.

३२. **वल्लकी** – मुरली. **विनोदसांद्रें** – आनंदातिशयाने, कामभावनेने. **परिरंभ**– आलिंगन.

३३. **काममोहधनकुंभ** – स्तन हे काम आणि मोहरूपी संपत्तीने भरलेले घट होत.

३४. **हाराहि** – हार हाच साप.

३. ४. जमिनीत पुरलेल्या धनाचे रक्षण साप करीत असतो अशी समजूत आहे. त्यानुसार काममोहरूपी धनाने भरलेल्या स्तनरूपी कुंभांचे रक्षण तिच्या गळ्यातील हाररूपी साप करीत आहे.

३५. **अहींद्र** – नागात श्रेष्ठ असा शेष.

१–३. मी प्रत्यक्ष शेषावर शयन करणारा आहे. त्या मला या सापाची भीती ती कसली, हा भाव.

३८. **पटीर** – चंदन.

२–४. असे वर्णन राधेच्या संदर्भात पुराणातून आले आहे. "चन्दनागुरु-

कस्तूरीकुङ्कुमद्रवमुत्तमम् । राधिकायाश्च सर्वाङ्गे प्रददौ माधवः स्वयम् ।।" ब्रह्मवैवर्तपुराण, द्वितीय भाग, अ. १५–१४५.

३९. **जाजी** – जाती किंवा जाईचे फूल. तेलुगूत जाईस 'जाजी' असे म्हणतात.

४२. **शयें** – हाताने.

४७. **घनसार** – कापूर. **शातकुंभ**– सोने. **तां**– त्वा, तू.

५०. **नूपुराव** – पैंजणाचा आवाज.

५३. **नगयुग** – पर्वतांची जोडी. अस्ताचल व उदयाचल.
२. तारका लोपल्या. अस्ताचलावर चंद्र मावळत होता व उदयाचलावर सूर्य उगवत होता.

६१. १.२. जागृती, स्वप्न आणि सुषुप्ती ह्या अवस्था ओलांडून तुरियेची शेवटची अवस्था तिला प्राप्त झाली. ब्रह्माच्या ठायी तिची चितवृत्ती लीन झाली.

६७. **जगच्चक्षु** – सूर्य.

६८. **वाताशनारी** – (वाताशन= साप, अरी) गरुड.

६९. **निजाग्रज** – स्वतःचा (गरुडाचा) ज्येष्ठ बंधू अरुण.
१. कृष्णाचा उपदेश किंवा आज्ञा शिरसावंद्य मानून.

० ० ०

## चतुर्थोल्लास

कथाभाग : कृष्णस्त्रियांना कृष्णाच्या गुप्त प्रेमाची लागलेली चाहूल – शुकाची उपाययोजना – शुकाचे रुष्ट कृष्णस्त्रियांकडे जाणे – शुकाचा आणि स्त्रियांचा संवाद – शुकाच्या चतुरोक्तीने स्त्रियांचा संशयनिरास.

१. **नागांतक** · गरुडाचे नाव.

४. **वैनतेय** – विनतेचा पुत्र अरुण.

५. **कर्णजप** – कानात पुटपुटणे. **श्रीचंपकेशा** – चंपकारण्यात निवास करणाऱ्या कृष्णास.

७. **कर्णांतविश्रांतविलोचनानें** – आकर्ण नेत्रांनी.

९. **वित्पत्य** – विचारशक्ती. 'व्युत्पत्ति' वरून सिद्ध झालेले रूप असावे.

१०. **संधानचातुर्य** – उपाययोजनेचे कौशल्य. **कलत्रें** – स्त्रिया. **भदितों** – फट पाडतो.

१४. **गांधर्वबोडांबरी** – आविर्भाव. गंधर्व हे मायाविद्येत प्रवीण होते. त्यांनी निर्माण केलेले आडंबर (देखावा). यावरून हा शब्दप्रयोग सिद्ध झालेला दिसतो.

१. **तुलना:** द. स्व. श्लोक ४५. ४

१७. ४. नावाप्रमाणे अनेकांशी मैत्री करणारी मित्रवृंदा एका कृष्णाचीच तेवढी भक्ती कशी करील ?

२२. **ऋक्षाध्यक्षसुता** – अस्वलांचा प्रमुख असलेल्या जांबवानाची कन्या, जांबवती. **नीला** – एका सखीचे नाव. **खपुष्पसम** – असंभाव्य.

२३. **कालिंदी** – कृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक.

२४. २. स्त्रिया ह्या चुकीस पात्र असतात, ही सर्वत्र अनुभवास येणारी गोष्ट आहे.

२७. **पूर्वाण्हीं** – सकाळी. **विलासाकुलें** – १. क्रीडेच्या आसक्तीने. २. कामक्रीडेच्या लालसेने. **देवेंद्रानुज** – कृष्ण. वामनावतारात विष्णू हा इंद्राचा कनिष्ठ बंधू असतो. **आकाशकायासुर** – १. आकाशाप्रमाणे विशाल शरिराचे राक्षस. २. शून्यशरीर मदन. **दलिलें** – विदीर्ण केले, जखमी केले. **श्रीधाम** – श्रीकृष्णाचे शरीर किंवा लक्ष्मीचे आश्रयस्थान असा कृष्ण.

३०. **अतनु** – १. गुप्त राहून लढणारा (असुर). २. अनंग (मदन). **श्यामा**– १. अंधारी रात्र. २. सुंदर स्त्री. **वारुणी** – १. पश्चिम दिशा २. मद्य.

३३. **कुवलयोज्ज्वलबाण** – १. पृथ्वीला उजळून टाकणारे तेजस्वी बाण. २. फुललेल्या नीलकमलाचे बाण.

३४. **इंद्रधाम** – १. इंद्राचे निवासस्थान २. इंद्रनीलमण्यांनी जडविलेला क्रीडाशैलावरील प्रासाद.

३५. **चंद्रतुंडा** – १. इंद्राच्या शक्तीचे येथे कल्पिलेले नाव. २. चंद्रमुखी मनोरमा. गरुडाने इंद्राची शक्ती 'चंद्रतुंडा' (दुसऱ्या अर्थी, मनोरमा) आपल्या

पाठीवर वाहून पृथ्वीवर आणली. आणि त्या शक्तीने अमृत (दुसऱ्या अर्थी, अधरामृत) देऊन कृष्णास वाचविले, हा भाव.

गरुडाने आपली आई विनता हिची कद्रूच्या दास्यातून मुक्तता व्हावी म्हणून स्वर्गातून अमृत आणल्याची कथा प्रसिद्ध आहे. (महाभारत, आदि· अ. ३३) या कथेचा उपरोक्त कल्पनेसाठी उपयोग करून घेतला आहे.

३६. **दुर्गमशैलदुर्गा** – १. दुर्गम पर्वतावरील किल्ला.
२. मनोरमेचे उन्नत कुच. तुलना : द. स्व. श्लो० ७०.

३९. पार्श्वभागाच्या शिखरांना प्रकाशित करणारा पूर्वाचलावरील सूर्य हा सिंह होय. त्याने कठिण अशा नीलजलयुक्त ढगरूपी हत्तींच्या कळपांना भेदून त्यांच्या गंडस्थळातील मांसाचे सेवन केले. सायंकालीन रागाने रंगलेला आकाशातील तारकांचा समुदाय म्हणजे सिंहाने वमन केलेले रक्ताच्या स्पर्शामुळे लाल झालेले हत्तींच्या गंडस्थळातील मोती होत.

४०. **कल्पोत्तर** – १. योग्य उत्तर २. काल्पनिक उत्तर.

४३. **अवरोधरामा** – अंतःपुरातील सुंदर स्त्रिया. **चारीं** – गुप्त हेरांनी. **बलसिंधुरामा** – शक्तीचा सागरच अशा बलरामाला.

o o o

## पंचमोल्लास

**कथाभाग** : गुप्तचराने आणलेल्या वार्तेमुळे कोपायमान झालेला बलराम – त्याचे कृष्णशोधार्थ ससैन्य निघणे– बलरामाच्या सेनादलास आज्ञा – पूर्वेकडील समुद्रकिनाऱ्यावर आगमन – बाणांच्या साहाय्याने समुद्र शुष्क करणे – चित्रसेन आणि बलराम यांचे युद्ध–चित्रसेनवध

२. **आर्भाट** – (सं. भट = बोलणे) आवेशाने ओरडणे, गर्जना करणे.

३. **थाट** – जमाव, समुदाय. **उद्वेल** – मर्यादा उल्लंघणे.

६. **द्वात्रिंशत्प्रबळाश्व** – बत्तीस बलवान घोडे. **तालध्वज** – ज्याचा ध्वज ताडाच्या झाडाने अंकित असतो असा, बलराम. **स्यंदनीं** – रथास.

७. **पटह्** – युद्धनोबत.

८. **शतांग** – रथ.

१०. १–२. अन्वय : जो रथांगहस्ती सिंह सांग देवांतक मस्त हस्ती संहारितां.

११. **भुजसत्व०** – समुद्राला माझ्या बाहुबळाची अद्याप कल्पना नाही.

१२. **कृष्णावनोपकृति** – (कृष्ण, अवन, उपकृति) कृष्णाचे रक्षण केल्याचा उपकार (उपरोधाने).

३. ठार मारलेल्या असुरांच्या स्त्रियांच्या अश्रूंनी.

१४. **वोडउनि स्वमाथां** – स्वतःचे मस्तक पुढे करून, शिरसावंद्य मानून. **सेंडूनि**– हवेत फिरवून. **साट** – आसूड, चाबूक.

१८. **आटोपिलें** – वेढा घातला.

२०. **कामपाल** – बलराम.

२३. **कृष्णानीक** – कृष्णाचे सैन्य. **पदरेणुकैतवतमें** – धुळीने निर्माण झालेल्या अंधःकाराच्या भासामुळे. **नीलांबर** – निळे वस्त्र परिधान करणारा, बलराम.

२४. **ग्राव** – दगड.

२६. रथांच्या चाकांमुळे जमिनीवरील तृणाचा चुरा झाला. यामुळे बलरामाशी होणाऱ्या युद्धात शरणागती पत्करल्यावर आपणांस दांती धरण्यास कांही राहणार नाही अशी असुरांना भीती वाटली. 'दांतीं तृण धरणें' हा वाक्प्रचार मराठीत रूढ आहे.

२७. **संकर्षण** – बलराम. **इंद्रसनर्चिता** – इंद्राने ज्याची पूजा केली आहे त्या (त्यागेश्वरास). **त्यागेश्वर** – त्यागराज, शंकर.

३१. **वाहिनीपति** – पहिल्या चरणात नद्यांचा पती, समुद्र व दुसऱ्या चरणात सैन्याचा प्रमुख, सेनापती हा अर्थ. **कुंभिनीभवरजःपुंज** – हत्तींच्या चालण्यामुळे उडणाऱ्या धुळीचा लोट. **कुंभजात** – अगस्ती ऋषी.

३२. **नेमी** – चाकाची धाव. **सिंधुर** – हत्ती. **बृंहित** – हत्तीचे चित्कार. रथाला लावलेल्या घंटयांचा आवाज, नाचणाऱ्या घोडयांच्या पायांतील नूपुरांचा ध्वनी व यात भर म्हणून हत्तींचे भयंकर चित्कार, हे सर्व कानी पडल्यामुळे समुद्राला धडकी भरली व त्याने मोठयाने गर्जना केली.

३३. २. **मीनांक** – ज्याच्या ध्वजावर माशाचे चिन्ह असते असा मदन. माशांना आश्रय देणारा म्हणून समुद्रही 'मीनांक'च होय. यामुळे स्वतःचे नाव धारण करणाऱ्या समुद्रास पाहून मदन (प्रद्युम्न) क्रोधाविष्ट झाला.

४४. **कालायसपिंड** – (काल, आयस, पिंड) तोफेचे काळे लोखंडी गोळे.

४५. **दाशार्ह** – दाशार्हाचे वंशज असलेले यादव.

४७. **घाय** – घायाळ (सं. घात, प्रा. घाय).

४८. **अवचट** – अकस्मात. **त्रिदशरिपु** – देवाचे शत्रू, असुर.

५२. **सेन** – श्येन, ससाणा पक्षी. **दोर्बल**–(दोस्, बल) बाहुबल.

५८. **विघूर्णला** – घुसळला गेला.

५९. **कुलाद्रि** – सप्तपर्वत : महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान, गंधमादन, विंध्य, पारियात्र.

६०. **चंद्रार्धमुखाशुगातें** – अर्धचंद्राकार टोक असलेल्या बाणास.

६१. **गृध्रपत्र०** – गिधाडाच्या पिसांनी व मण्यांनी सुशोभित केलेला बाण. ( पुंख – बाणाचा पिसे लावलेला भाग. ) **पक्षानिलेंच** – पिसांच्या आघाताने निर्माण होणाऱ्या वाऱ्याने.

६२. **सुपर्वजालें** – बाणांच्या समुदायाने. **दिग्वर्ग** – दिशासमूह. **खर्वंकर** – ठेंगू करणारे. **शर्व** – शंकर. **स्ववाहिनी** – स्वर्गातील नदी.

६३. **शिरोरुह** – केस. **भ्रमतानुपातीं** – फिरत फिरत जवळ पडताना. **स्वर्भानु** – राहू.

६४. १. इंद्राच्या वज्रामुळे भंग पावलेल्या मंदर पर्वताच्या शिखराप्रमाणे.

## षष्ठोल्लास

**कथाभाग :** चित्रसेनाच्या मृत्युमुळे त्याच्या पत्नीने केलेला शोक – विचित्रसेनाचे दुःख-मयाकडून सांत्वनपर शब्द – असुरसैन्य व यादवसैन्य यांचा तुंबळ रणसंग्राम–युद्धात विविध अस्त्रांचा व मायावी विद्येचा झालेला प्रयोग.

१. **द्विषच्छीर्ष** – शत्रूचे डोके.

२. ४. देवांचा अंत करणाऱ्या चित्रसेनाचा निर्बल मानवाने वध केला.

४. **निर्भिन्नलें** – दुभंगलेले.

५. **पाशपाणी** – यम. **वित्तेश** – कुबेर.

६. **रविप्रभेचीं** – सूर्याच्या कांतीप्रमाणे तेजःपुंज (अशी इंद्राणीची वस्त्रे.)

७. **मुखास मुद्रा घालणे** – न बोलणे.

१२. **मोहनांगी** – चित्रसेनाच्या पत्नीचे नाव. **मोहिनी** – विचित्रसेनाची पत्नी.

१४. १–२. विचित्रसेनाचा कुशल उजवा हातच असा चित्रसेन इंद्रादिकांच्या कीर्तिचंद्राला राहूप्रमाणे ग्रासणारा होय.

१५. **सपदि** – तात्काळ.

१६. **हुतभुज** – अग्नी.

१७. **स्मर्तृगामी** – स्मरण केल्याबरोबर प्रकट होणारा.

१८. **यदुप्रवरसंहती** – यादवश्रेष्ठांचा समुदाय.

१९. **जघन्य** – नीच, दुष्ट.

२४. **धावे** – हल्ले.

२६. **सौमेरवाग्रापरी** – सुमेरु पर्वताच्या शिखराप्रमाणे तेजःपुंज.

२८. **वादित्रारव** – रणवाद्यांचा आवाज.

२९. **स्वनामघोषें** – युद्धप्रसंगी स्वतःच्या नावाचा उच्चार करून योद्धे प्रतिस्पर्ध्यांना आव्हान देत असतात.

३०. **भिंडिमाला** – गोफण, एक शस्त्र.

३२ **भोंवणें** – चक्कर येणे.

३३. **विटाऊं** – वेडावण्यासाठी.

३४. ३–४. रथातील योद्धचास सारथ्यावर अवलंबून राहावे लागते. अशा परावलंबित्वामुळे मनोजोगे लढता येत नाही. म्हणून बलरामाने रथाखाली उडी टाकून तो स्वतंत्रपणे लढू लागला.

३८. **हलायुध–बलार्दित** – बलरामाच्या सैन्याने घायाळ झालेले.

३९. **मुसलायुधातें** – मुसळ हे ज्याचे शस्त्र आहे अशा बलरामाला.

४०. रणदुर्मद, लोकांतक, चित्रध्वज ही असुरांकडील योद्धयांची नावे. **मदनात्मज** – प्रद्युम्नाचा पुत्र अनिरुद्ध.

४१. **हुतभुक्कण** – अग्नीचे स्फुलिंग.

४३. १. "कामातुराणाम् न भयं न लज्जा" या सुभाषिताचा अनुवाद.

४४. **निर्जरी** – देवस्त्रिया. **रतिदंभा** – रतिभोगाच्या मिषाने.

४५. देवस्त्रियांच्या कटाक्षबाणांनी ज्ञानी असलेले यादववीर मोहित झाले नाहीत. परस्त्रीविषयक अभिलाषेमुळे प्रत्यक्ष इंद्राला पीडा झाली होती. गौतमपत्नी अहिल्येचा इंद्राने उपभोग घेतल्यामुळे गौतम ऋषीने त्यास शाप दिला, ह्या कथेच्या संदर्भात.

४८. **पाणिपदोत्तमांग** – पाय, हात आणि डोके.

४९. **पंचवक्त्रप्रतापीं** – सिंहाचा पराक्रमरूपी अग्नीत. **प्रपंचत्व पावले** – पंचत्वाप्रत पावले, मरण पावले.

५०. **प्रलंबघ्न** – प्रलंब राक्षसाला मारणारा, बलराम.

५४. **लोहपिंडाशनिचंडपातें** – वज्राप्रमाणे भयंकर असलेले लोखंडाचे गोळे पडल्यामुळे. **यादव-भूभृत** – यादवरूपी पर्वत.

५५. **शंबरारी** – शंबर राक्षसाचा वध करणारा, प्रद्युम्न. **शांबरी** – माया, जादू.

६१. **थोंकला** – स्थिरावला, थांबला.

६२. **हरिद्रा०** – हरिद्रा हे नाव असलेल्या समुद्रातील प्रासादात.

० ० ०

## सप्तमोल्लास

**कथाभाग :** कृष्णाचे क्षेम जाणून घेण्यास आतुर झालेल्या कृष्णस्त्रियांचा हरिद्रानदीतील सौधात प्रवेश— असुराच्या शस्त्राघातामुळे जखमी झाल्याचे कृष्णाचे कपट-नाटक — कृष्णाने द्व्यर्थी शब्दयोजनेतून सत्य लपविण्याचा केलेला प्रयत्न — स्त्रियांचा संशयनिरास — कृष्णाची स्त्रियांसह जलक्रीडा व आनंदोल्लास.

२. १–२. कमलपुष्पांच्या ठायी लीन होऊन मधुसेवन करणारे भृंगे पाहून कृष्णाच्या मनात कामभाव जागृत झाला.

८. **कंचुकी** — अंत:पुराचा द्वारपाल.

९. कृष्णाचे ध्यान करीत चाललेल्या, कुंदकळ्यांप्रमाणे दात असलेल्या त्या चंद्रमुखी सुंदरी म्हणजे चालत्या बोलत्या सौंदर्याच्या वेलीच होत. त्यांच्या अंगावरील दागिने ही विविध रंगाची प्रफुल्ल फुले असून पायांतील वाळ्यांचा रुणझुण रव म्हणजे फुलांवर बसलेल्या भुंग्यांचा गुंजारव होय, असे त्यांना (नागरिकांना) वाटले.

१०. **चेटिकांनीं** — पक्षांनी.

११. **तपन:** — उकाडा. **उद्भिन्न** — निर्माण झालेला. **आतप** — सूर्याची उष्णता. **आडंबर** — प्रकर्ष. **सूक्ष्मांबरा** — पातळ वस्त्र नेसलेल्या. **दिक्चक्रवाल** — दिशांचा समूह. **सिंधूतटा** — येथे हरिद्रानदीसच समुद्र कल्पिले आहे.

१५. **संक्षेपणें** — वल्हवणे. **पाणियुगप्रभावें** — दोन्ही हातांनी. **तरी** — नावा.

१८. **यदूद्वहांगा** — (यदु, उद्वह, अंगा) यदुकुलात जन्मलेल्या कृष्णाच्या अंगास.

२२. **भवदर्पित** — तुला अर्पण केलेले. **तवागति** — तुझी अगतिकता.

२५. **वर्मविहीन** — चिलखताशिवाय.

२६. **आकर्ण ते बाण** — १. धनुष्य आकर्ण ओढून मारलेले बाण (असुर पक्षी). २. आकर्ण नेत्र असलेल्या मनोरमेचे कटाक्ष. **शूल करस्थ** — १. हातातील

शूल हे हत्यार (असुर पक्षी). २. शूलाप्रमाणे तीक्ष्ण अशी मनोरमेच्या बोटाची नखे.

३४. **महांडजातें** – विश्वाची उत्पत्ती करणाऱ्या कृष्णास.

३५. **जनरत्नसूत्रें** – लोकांचा रत्नहार अशा कृष्णाने.

४३. **बल्लवेशें** – (बल्लव, ईश) गोपाळांचा स्वामी असलेल्या कृष्णाने.

४४. **आसव** – मद्य.

४५. ३. मादकतेमुळे त्यांचे डोळे तांबूस व धुरकट दिसत होते.

४८. **विश्वरूप** – विष्णूचे नाव.

४. कृष्णाने अगोदरच मारलेल्या कौरवांचा वध करण्याकरिता अर्जुन ज्याप्रमाणे निमित्तमात्र झाला, त्याप्रमाणे हा काव्यप्रबंध लिहिण्यास कृष्णाचीच प्रेरणा कारणीभूत झाली असून मी केवळ निमित्तमात्र आहे.

५२. यातील आशयास श्रीमद्भागवताचा आधार आहे. श्रीमद्भागवत, १०–३३–३१.

५४. **मदाभीरु** – मद्यपानामुळे उद्धत झालेल्या. **भीरुचक्र** – स्त्रीसमुदाय.

५५. **सर्ग-स्थिति** – निर्मिती व सांभाळ.

५७. **शोणपद्मेक्षणा** – लाल कमलाप्रमाणे आरक्त नेत्र असलेल्या स्त्रिया.

५८. जलक्रीडेत पाण्याचे तुषार उंच आकाशापर्यंत उडून खाली पडत. त्यावर अशी कल्पना केली आहे: विष्णूने वामनावतारात एका पावलाने पृथ्वी व दुसऱ्या पावलाने सारा स्वर्ग आक्रमिला आणि तिसरा पाय बळीच्या डोक्यावर ठेवून त्यास पाताळात लोटले. वामनाने वर केलेल्या पायामुळे (स्वर्ग आक्रमिण्याकरिता) स्वर्गातून पृथ्वीवर येणाऱ्या गंगेचा प्रवाह खंडित झाला. ह्या ताटातुटीमुळे स्वर्गंगा ही पृथ्वीवरील आपल्या सखीस भेटण्यास सारखी आतुर होती. वरून पडणाऱ्या तुषारांच्या रूपाने ती गंगा जणू खाली असलेल्या सखीस भेटण्यास आली. अशा रीतीने दोन्ही प्रवाह एकत्र आले. गंगा ही विष्णूच्या चरणातून निघाली. म्हणून तिला 'विष्णुपदवासिनी' असे म्हटले आहे.

५९. **सरिल्लोलकल्लोल** – नदीच्या चंचल लाटा.

६०. **चक्रप्रधान तोयीं** – अनेक भोवरे असलेल्या पाण्यात. **द्विजचक्र** – जलचरांचा समुदाय. **चलच्चक्र** – फिरणारे चक्र (कृष्णाचे). **स्त्रीचक्रवालार्दित** – त्रासून गेलेला स्त्रीसमुदाय. **स्वनामें** – 'सुदर्शन' ह्या चक्राच्या नावास अनुलक्षून. **चक्रधामें** – श्रीकृष्णाने.

६१. **तदारभ्य** – तेव्हापासून. **अक्रूर** – पीडा न देणारे. **उद्धवें** – आनंदाने, उल्हासाने.

६२. **कुशेशयकुळ** – कमलांचा समुदाय. **सौगंधिकेंदीवरें** – (सौगंधिक, इंदीवर) सुगंधी नीलकमलाने. **कोकनद** – लाल कमल. **पुंडरीक** – शुभ्र कमल **प्रेरितां** – फेकता.

६३. **दलित** – तुटलेले, फाटलेले. **निरवलंब** – आश्रयहीन. **रोलंब** – भुंगे.

कृष्णाने व कृष्णस्त्रियांनी परस्परांवर कमलपुष्पांचा मारा केल्यामुळे त्यांतील भुंगे आपोआपच बाहेर पडले. त्यांचे आश्रयस्थान असलेली कमलपुष्पे विशीर्ण झाल्यामुळे निराश्रित झालेले ते भुंगे उच्च स्वर काढून उंच उडाले. जणू त्यांनी स्वतःचे घर हस्तगत केल्याबद्दल (कृष्णाचा वडील बंधू असलेल्या) इंद्राकडे तक्रार केली.

६४. **पटवास** – चूर्ण (सुगंधी)

३-४. फुलांचे सोनेरी केसर परस्परांच्या डोळ्यात जात. जणू केसरी (फुलांचे केसर)रूपी केसरी (सिंह) डोळेरूपी मदोन्मत्त हत्तीस विव्हळ करीत होते.

६५. **गंडूषोद्दंडकांडें** – जोराने टाकलेल्या पाण्याच्या चुळीमुळे. **करिकरदृक्-पद्मिनीशा** – हत्तीच्या सोंडेप्रमाणे बळकट असलेल्या कृष्णास.

६६. **तटस्था** – काठावर असलेल्या.

६८. **रळी** – थट्टा, विनोद.

○ ○ ○

## अष्टमोल्लास

**कथाभाग :** बलराम–असुरयुद्ध द्वारकेवर येऊन ठेपल्याने नागरिकांना वाटणारी चिंता – त्या संदर्भात आलेली आदर्श राजाची कर्तव्ये – शुकाची कृष्णास द्वारका-रक्षणार्थ प्रार्थना – त्यानुसार गरुडारूढ होऊन कृष्णाचे युद्धार्थ निघणे – विचित्रसेन व कृष्ण यांचा निकराचा रणसंग्राम – कृष्णाकडून विचित्रसेनाचा वध.

३. **अंशुमाली** – सूर्य.

८. **दनुजपट्टण** – मयाने राक्षसांकरिता निर्मिलेली आकाशातील नगरी.
**आटोपिलें निरखिलें** – दृष्टीच्या टप्प्यात घेऊन निरीक्षण कले.

११. पराक्रमी गरुड युद्धात भाग घेण्यासाठी उतावीळ झाला; पण तो गेल्यास कृष्णाला युद्धकार्यासाठी वाहन राहणार नाहीं. म्हणून शुकाने त्यास शांत राहण्यास सांगितले.

१३. **शरणार्थी०** – शरणागताचे रक्षण करण्याकरिता ज्याने चक्र धारण केले आहे, असा कृष्ण.

१८. शुकाच्या वाङनिश्चयामुळे कृष्ण हा वर विचित्रसेनाच्या सैन्याशी युद्ध करुन विजयश्रीरूपी वधू प्राप्त करण्यासाठी गेला.

२०. बाणासुराची कन्या उषा व प्रद्युम्नाचा मुलगा अनिरुद्ध यांच्या विवाहाचा उल्लेख येथे आहे.

२३. **दोर्दंड** – ( दोस्, दंड ) काठीप्रमाणे मजबूत बाहू.

२५. **जगत्राणकारी** - जगाचे रक्षण करणारा.

२८. **सपर्या** – पूजा.

३१. युद्धाच्या आनंदात कृष्णाने फुंकलेल्या पांचजन्य शंखाच्या आवाजामुळे पाच शत्रू गर्जना करीत प्रकट झाले. ( व या आवाजात ‘ पर्जन्यजन्यरव ’ म्हणजे बाणांच्या वर्षावाचा आवाज समाविष्ट झाला. ) यातील आशय प्रलय-कालाच्या अवस्थेला अनुलक्षून आहे. पृथ्वीची उत्पत्ती आकाश – वायू-अग्नी – आप – पृथ्वी ( पुढे अन्न व पुरुष ) अशा क्रमाने झाली. प्रलयाच्या वेळी उलट क्रमाने एकाचा दुसऱ्यात विलय होतो, व शेवटी शून्याकार आकाश तेवढे शिल्लक राहते.

३२. **कौमीदकी नंदक** – विष्णूची गदा व तलवार ही आयुधे.

३५. **नैजमौळी** – स्वतःचे डोके.

३६. विचित्रसेनाने कृष्णावर बाणांचा वर्षाव केला. धैर्याचा मेरु असलेल्या कृष्णाने तशा शत्रूची पर्वा केली नाही. बळकट शरिरावर चिलखत परिधान केलेल्या त्या असुरावर मात्र क्षणातच हरण्याची पाळी आली.

३७. बगळा (किंवा करकोचा), घार आणि मोर ह्यांची पिसे लावलेले नाना प्रकारचे बाण कृष्णावर आघात करण्याकरिता आले; पण त्यांची कृष्णा-वयांशी मैत्रीच झाली. त्या बाणांची अग्रे व मध्यभाग तुटून पडला व मागे असलेली मोरपिसे मात्र अलंकार म्हणून त्याच्या डोक्यावर विराजमान झाली.

३८. शत्रुपक्षाला मिळालेला स्वपक्षीय युद्धात परत आपल्याकडेच आल्यास त्याचा योग्य तो मान राखावा. म्हणूनच शत्रूच्या बाणांबरोबर परत आलेल्या मोरपिसांना कृष्णाने मस्तकावर स्थान देऊन त्यांचा योग्य तो आदर केला.

३९. **रुक्मपुंख** – सोनेरी पिसे लावलेला बाणाचा भाग. **शिलीमुख** – बाण.

४०. **प्रभवति** – उत्पन्न होत असे. **ज्वालमाली** – ज्वालांची माला. **कालदंड** मृत्यू.

कृष्णाने सोडलेल्या त्या एका बाणातून कोटी बाण निर्माण होऊन त्यांचे गोलाकार जाळे तयार झाले. त्या गोलाकार बाणजालात सापडलेला विचित्रसेन त्यातून ज्वालांची माला निर्माण झालेली पाहत होता. हत्तीच्या सोंडेप्रमाणे लांब असलेल्या कृष्णाच्या हातातील गोल आकाराच्या धनुष्यातून निघालेली ती ज्वाला म्हणजे त्रिभुवनाला व्यापून टाकणारा व प्रत्यक्ष मृत्युरूपच असलेला प्रलयाग्नी वाटत होता.

४३. **अस्त्रांबुदाली** – अस्त्राने निर्माण झालेल्या मेघमाला.

४४. **अशनिविशिख** – वज्राप्रमाणे प्रभावी असलेले बाण.

४६. **मेहुडे** – मेघ. **जलहुडे** – पाण्याचे बुरूज.

४८. **संवर्त** – नाश

५५. **दिवौकस्** – (दिव = स्वर्ग किंवा आकाश, ओकस् = वसतिस्थान) देव.

५९. **चंद्रहास** – तलवार

६२. **व्योमकेश** – शंकराचे नाव. **भसित** – जळालेले.

६६. **स्वचक्रपुष्टीस** – आपण सोडलेल्या दुर्दर्शन चक्राच्या साहाय्यार्थ.

७१. **शतमख** – इंद्र.

## नवमोल्लास

**कथाभाग :** युद्धसमाप्तीनंतर झालेली कृष्ण-बलराम भेट – बलरामाने प्रद्युम्नाच्या शौर्याची केलेली स्तुती– कृष्ण, बलराम व इतर यादववीरांचा नगरात प्रवेश – कृष्णाचे विविध पौरवधूंनी केलेले स्वागत – वारवनितांचे कृष्णाच्या स्वागतार्थ नृत्यगायनादी कार्यक्रम – कृष्णाने अनेक रूपे धारण करून रुक्मिणीसह सर्व यादवस्त्रियांशी केलेला प्रणयविलास – अनिरुद्ध व उषा यांना झालेल्या पुत्रप्राप्तीचा प्रसंग.

२. **तदनु** – त्यानंतर. **दनुज०** – राक्षसांचा गर्व हरणारा कृष्ण. **भक्तदुःखेभयंता** – (भक्त, दुःख, इभ, यंता) भक्तांच्या दुःखरूपी हत्तीचे नियंत्रण करणारा.

४. **क्षमा-चक्रवर्ती** – पृथ्वीचा सम्राट.

१०. **श्रितमोदधामें** – आश्रयार्थ आलेल्यांना आनंद देणाऱ्या (बलरामाने).

१३. १. २ – संध्यारागाची तुलना भुकेमुळे प्रदीप्त झालेल्या यादवांच्या जठराग्नीशी केली आहे.

१४. **भुक्तायास** – जेवणानंतर येणारी जडता किंवा गुंगी. 'भुक्तायासम्' ह्या रूपात तेलुगूत नित्य वापरात येणारा शब्द. जेवणानंतर आलेले जाड्य हाच अंधार. तो नाहीसा करण्याकरिता मुखातील विड्याच्या तांबूस रसाने दिव्याचे तेज धारण केले होते.

३–४. स्वःच्या बाहुबलाने असुरांच्या आशा कृष्ण-बलरामांनी जशा उध्वस्त केल्या, त्याप्रमाणे अनेक मशाली, दिवे इत्यादी साधनांनी तेथील अंधार नाहीसा केला.

१५. **अमलकुवलयश्री** – १. शुभ्र कमलाची शोभा. २. पुण्यभूमी द्वारकेचे सौंदय.

२७. १. रत्नखचित, तेजस्वी व सहस्र शिखरांनीयुक्त असलेल्या मेरुपर्वतावर विसावणाऱ्या ढगास (रथस्थ कृष्णास).

२८. **अतःकच्छधरा** – कासोटा घातलेल्या. **स्कंधाक्रांत** – खांद्यावरून (पदर) घेतलेल्या. **धम्मील** – वेणी

२९. **निश्चोलचोलांगना** – चोळी न घातलेल्या तंजावर प्रांताकडील स्त्रिया. **केशप्रबंधोत्करा** – केशसंभार बांधलेल्या स्त्रिया.
४. पाण्याने भरलेले कलश घेतलेल्या शेकडो सुंदर स्त्रिया कृष्णास ओवाळण्याकरिता तत्परतेने उभ्या होत्या.

३०. **प्रत्यङ्मुख** – उलटचा. दक्षिणेत विशेषतः केरळात कुमारिका लग्न होई-पर्यंत उलटचा चोळचा वापरीत. महाराष्ट्रातील ब्राह्मण समाजात मात्र विवाहाच्या वेळीच वधूने उलटी चोळी घालण्याचा प्रघात आहे. यामुळे उलटचा चोळचा घातलेल्या स्त्रिया पाहून कवीने कृष्णाला वरू इच्छिणाऱ्या त्या जणू नवऱ्याच होत, असे म्हटले आहे. **हंसार्जितपदा** – हंसाकडून ज्यांनी चालण्याची रीती संपादन केली आहे, अशा स्त्रिया.
४. कृष्णाकडे अनिमीष नेत्रांनी पाहत राहिल्यामुळे त्या स्त्रिया देवी वाटत होत्या. देवांच्या डोळचांची उघडझाप होत नसते, ह्या संकेतास अनुसरून.

३१. **कस्तूरिकाकोज्ज्वला** – ( कस्तूरी, काक, उज्ज्वल ) कस्तूरीचा विराजणारा तिलक ज्यांनी कपाळावर लावला आहे अशा स्त्रिया. **काक** – पंथनिदर्शक तिलक, गंध. **कामकला०** – कामादिकलांत निपुण. **लोलांतरंगा०** – कामभावनने ज्यांची अंतःकरणे अस्थिर झाली आहेत अशा स्त्रिया. **असेचनक**– देदीप्यमान, सुंदर. **सूक्ष्मोत्तरीयांसका** – (सूक्ष्म, उत्तरीय, अंस = खांदा) खांद्यावर पातळ ओढणी घेतलेल्या स्त्रिया. **रामानुजबाळिका** – रामानुज-पंथी वैष्णव स्त्रिया.

३२. **कुंकुमोर्ध्वतिलक** – उभे लावलेले गंध किंवा कुंकू.
१–२. कृष्णाचे दर्शन घेण्यात रममाण झालेल्या, दाराशी रेलून उभ्या असलेल्या माध्वपंथी स्त्रिया ह्याच माधवी लता होत. त्यांतील कांही स्त्रिया स्तनपुष्पांच्या झुबक्यांनी युक्त अशा सुवर्णवेलीच वाटल्या.
श्लो० ३१ व ३२ यात कालविपर्यासाचा दोष घडला आहे.

३५. **वातायन** – खिडकी. **सितासितारुणरुची** – पांढऱ्या, काळचा व लाल रंगाची प्रभा.

३६. **लाजा** – लाह्या. **क्षितिधरवरसा** – मेरुपर्वताप्रमाणे.

कृष्णाचा रथ मेरुपर्वताप्रमाणे सुवर्णमय होता. त्यावर विलसणारी निशाणे वेलींप्रमाणे, त्याला लावलेल्या घंटांचा आवाज मेघांच्या गर्जने-प्रमाणे तर त्याला लावलेली भूषणे ही तळपणाऱ्या वीजेप्रमाणे वाटत होती.

रथाच्या ठायी ढगाचे अस्तित्व भासमान झाल्यामुळे पौरजनरूपी मयूर आनंदित झाले.

३७. रंभा, उर्वशी व तिलोत्तमा ह्या अप्सरांपेक्षाही त्या वारवनिता सुंदर होत्या, हा भाव.

३८. **ध्वानोत्करें** – (ध्वान:=आवाज, उत्कर=समूह) आवाजाने.

४०. **कांची** – मोक्ष देणाऱ्या प्रसिद्ध सात पुरींमध्ये याची गणना हो . हे प्रसिद्ध वैष्णवक्षेत्र मद्रासच्या नैऋत्येस बेचाळीस मैलांवर आहे. **कांतोरु** – पत्न्यांच्या मांडया.

४३. **ताटंक०** – चमकणारी भूषणे घातलेल्या कानांचे चुंबन घेणारे नेत्र असलेल्या स्त्रिया, आकर्णनेत्री स्त्रिया.

४४. **शृंगिशृंग** – पर्वतशिखर.

४६. **स्मरार्तांतरंगा** – मदनाने ज्यांचे अंत:करण विव्हळ झाले आहे, अशा स्त्रिया.

४८. **इंदुमौळिनवसें** – शंकराला नवस केल्यामुळे. **इंदुवंशमणि** – चंद्रवंशातला श्रेष्ठ पुरुष, कृष्ण.

५१. १–२. रुक्मिणी कृष्णासह स्वगृही जाताना इतर स्त्रिया दु:खी झाल्या.

५२. ३. **तुलना** : 'निजहृदयनिवासी काय बाहेरि आला.' द. स्व. श्लो. २०१.

५५. **मणितांकवीणा** – मण्यांनी जडवलेली मांडीवर ठेवलेली वीणा.

५६. कृष्णस्त्रियांचे सौंदर्य हे सरोवर असून कामसुखाच्या इच्छेने कृष्णाने त्यात मत्त हत्तीप्रमाणे क्रीडा केली. हत्ती पाण्यातील कमळे तोडतो, चुरगाळतो; त्याप्रमाणे कृष्ण स्त्रियांच्या इंद्रियाशी लीला करण्यात मग्न झाला. तुलना : श्रीमद्‌भागवत, १०–३३–२३. तसेच '....रेमे स्वयं स्वरतिरत्र गजेंद्रलीला' १०–३३–२४.

५९. **चंद्रोपलीं** – चंद्रकांत मण्यांनी.

३. चंद्रवंशरूपी समुद्रात जन्मलेल्या चंद्राबरोबर, कृष्णाबरोबर.

६०. **प्रत्यंगनेतें** – (प्रति, अंगनेतें) प्रत्येक स्त्रीबरोबर.

० ० ०

हरिद्रानदी —— राजगोपालमंदिराजवळील प्रसिद्ध तीर्थ

परिशिष्ट : १

# दक्षिणद्वारका मन्नारगुडी

मन्नारगुडी हे दक्षिणेतील प्रमुख वैष्णवक्षेत्र म्हणून प्रसिद्ध आहे. तंजावरच्या आग्नेय दिशेस चोवीस मैलांवर हे क्षेत्र असून सध्या ते तालुक्याचे ठिकाण आहे. याचे पूर्वीचे नाव राजराजचतुर्वेदीमंगलम् असे होते. येथे जुनी एकंदर दहा मंदिरे असून त्यातील पाच शिवाची, चार विष्णूची व एक जैनाचे आहे. या सर्व मंदिरांत 'राजगोपालमंदिर' सर्वांत प्राचीन व विख्यात आहे.

हे मंदिर कुल्लोत्तुंग चोल पहिला (इ. स. १०७०–११२०) याने बांधले, असे येथे सापडलेल्या शिलालेखावरून दिसून येते. या मंदिराचा जीर्णोद्धार पुढे तंजावरचे तेलुगु राजे रघुनाथ नायक व विजयराघव नायक ह्या पितापुत्रांनी केला असा समज आहे. ह्या पितापुत्रांत विजयराघव नायक हा राजगोपालाचा एकनिष्ठ उपासक असून तो स्वतःला 'मन्नारुदास' म्हणवीत असे. नायक राजांपासून ह्या क्षेत्रास विशेष प्रसिद्धी मिळाली व पूर्वीचे 'राजराजचतुर्वेदीमंगलम्' हे नाव जाऊन 'मन्नारगुडी' हे नाव प्राप्त झाले.

या क्षेत्राचे माहात्म्य ब्रह्मांडपुराणातील 'विष्णुक्षेत्रखंडा'मध्ये 'चम्पकारण्य-माहात्म्य' या आख्यानात (अध्याय, ६१ ते ६८) आले आहे. रूढ ब्रह्मांडपुराणात हे आख्यान आढळून येत नाही. तंजावरचे सरस्वती महाल ग्रंथालय व मद्रासचे शासकीय प्राच्य हस्तलिखित ग्रंथालय या दोनच संस्थांतून हे आख्यान असलेल्या ब्रह्मांडपुराणाच्या प्रती उपलब्ध आहेत. या आख्यानात मन्नारगुडीस 'दक्षिणद्वारका' हे नामाभिधान कसे प्राप्त झाले, यासंबंधीची पुढील कथा दिली आहे.

मन्नारगुडीच्या आसमंतातील प्रदेशाला पूर्वी 'चम्पकवन' हे नाव असून तेथे वन्हिमुख नावाचा साधू राहत असे. त्यास दोन मुले होती. एकाचे नाव गोप्रलय असून दुसऱ्याचे गोभिल असे होते. गोप्रलय हा प्रारंभापासून विष्णूची उपासना करीत असे. त्याने वैराग्यमय जीवन पत्करून विष्णूच्या प्राप्त्यर्थ घोर तपश्चर्या केली. त्याच्या तपामुळे विष्णू प्रसन्न होऊन त्याने दर्शन दिले. गोप्रलयाच्या इच्छेनुसार विष्णूने द्वारकेप्रमाणे गोपालरूपाने चंपकवनात निवास केला

(साक्षाद्गोपालवेषेण भगवांस्तत्र संस्थितः ६४-४०.) आणि त्या स्थानाचे नाव ‘दक्षिणद्वारका’ असे ठेवले. गोभिल हाही आपल्या बंधूप्रमाणे विष्णुभक्त होता. विष्णुकृपेने दोघांनाही पुढे वैकुंठात स्थान मिळाले.

या पुण्यभूमीत ‘हरिद्रानदी’ नामक तीर्थाचेही विशेष माहात्म्य आहे. मन्नारगुडीतील एकूण अकरा तीर्थांपैकी ही सर्वांत पवित्र मानलेली आहे. हिला नदी म्हणून संबोधीत असले तरी वास्तविक तो एक तलाव आहे. हा तलाव राजगोपालमंदिराजवळ असून त्याच्या मध्यभागी वेणुगोपालस्वामीचे एक छोटेसे देऊळही आहे. (सोबत दिलेल्या छायाचित्रावरून याची कल्पना येईल.) या तलावात कृष्णाने गोपींसह जलक्रीडा केली. केशर व हरिद्रा यांची अंगाला उटी असलेल्या गोपींच्या स्नानामुळे याचे पाणी पिवळे झाले. म्हणून ती ‘हरिद्रानदी’ या नावाने ओळखली जाऊ लागली.

**हरिद्राकुङ्कुमाक्तानां गोपीनां देहमज्जनात् ।**
**तन्नदीसलिलं सर्वं हरिद्राजलवद्बभौ ।। ६३-१४ ।।**

या तीर्थाचे माहात्म्य सांगणारी पुढील कथा उपरोक्त आख्यानात आली आहे

सौराष्ट्र (गुजरात) येथे पूर्वी राजशेखर नावाचा राजा राज्य करीत होता. तो एकदा अरण्यात शिकारीस गेला असता तहानेने व्याकूळ झाला. जवळच त्याला यज्ञशील नावाच्या ऋषीचा आश्रम दिसला. त्या ऋषीने त्याचे स्वागत करून त्यास अन्नपाणी दिले. राजा संतुष्ट होऊन राजधानीस परत गेला. पुढे एका प्रसंगी राजाकडून ऋषीला वाईट वागणूक मिळाली. अपकार करणाऱ्या ह्या राजाचा त्याला राग येऊन त्याने त्यास शाप दिला. शापामुळे वेडा झालेला राजा इतस्ततः भटकू लागला. असाच एकदा भटकत भटकत तो यज्ञशील ऋषीच्या आश्रमापुढे आला. राजाची शोचनीय स्थिती पाहून ऋषीला त्याची कीव आली. त्याने राजास व्याधिमुक्त होण्याकरिता पापनाशिनी हरिद्रानदीत स्नान करण्याचा उपाय सुचविला. ऋषीसह राजा मन्नारगुडीस आला. हरिद्रानदीत विधिवत् स्नान करताक्षणीच तो रोगमुक्त झाला.

‘राजगोपालविलासम्’ ह्या तेलुगु काव्यात ‘अग्निकल्प’ ग्रंथाच्या आधारे या स्थानाचे माहात्म्य विविध प्रकारे वर्णिलेले आढळून येते. लक्ष्मीने येथे

दीर्घकाल वास्तव्य केले व ती पुढे विष्णूशी विवाहबद्ध झाली, असेही एके ठिकाणी आले आहे.

'चम्पकारण्यक्षेत्रमाहात्म्य' या उपरोक्त आख्यानात विष्णूची प्रसिद्ध क्षेत्रे वर्णिताना–

**पाण्डुरङ्गगिरिश्चापि यत्र विठ्ठलनामकः ।**
**आस्ते विष्णुः प्रसन्नात्मा सर्वेषाञ्च वरप्रदः ॥ ६६-१२ ॥**

असा पाण्डुरंगगिरीवर निवास करणाऱ्या विठ्ठलाचा उल्लेख आला आहे. हा उल्लेख पंढरपूरच्या विठ्ठलास अनुलक्षून आहे की काय हे निश्चितपणे सांगता येत नाही. तरी एका दृष्टीने 'राजगोपाल' व 'विठ्ठल' यात साम्य आहे. महाराष्ट्रात विठ्ठलाचे जे महत्त्व तेच तामिलनाडूत राजगोपालाचे आहे. महाराष्ट्रात भक्त पुंडलिकाच्या योगे द्वारकेचा राणा पंढरपुरात अवतीर्ण झाला, त्याप्रमाणे गोप्रलयाच्या भक्तीमुळे तो मन्नारगुडीत वास्तव्य करू लागला. दोन्ही ठिकाणी कृष्ण गोपालरूपातच निवास करतो, हे लक्षात ठेवण्यासारखे आहे. मन्नारगुडीस 'दक्षिणद्वारका' म्हणून दक्षिणेकडील पुराणकार गौरवू लागले. एकनाथासारख्यांनी हा मान पंढरपुरास दिला. 'दक्षिणद्वारका पंढरी । शोभतसे भीमातीरीं' असे एकनाथाने एका अभंगात म्हटले आहे (अभंग क्र. ४२९). विष्णुभक्तीच्या प्रसारप्रक्रियेतील ही साम्यस्थळे सांस्कृतिक इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची ठरावी.

# श्यामराजाची स्फुट रचना

## (अ) दक्षिणद्वारकापर चूर्णिका *

अहो नगरिपुनगरीपरी निरुपमनिर्जरांगना निबिड-संचार-शृंगारका ॥
भासुरभोगवतीपरी बहुविधभोगसंपन्नभुजगपेटिका ॥
प्रभ(फु)ल्लपद्मिनीपरी निरंतरलक्ष्मीनिवासभूमिका ॥
शरत्पूर्णचंद्रिकेपरी कुवलयानंदकारका ॥
सफळरंभाटवीपरी शुकादिद्विजप्रियफळदायका ॥
मनोहरयुवतीपरी पयोधरशातकुंभकुंभधारका ॥
कमनीयकामधेनुपरी श्रीराजगोपाश्रितसर्वाभीष्टप्रपूरिका ॥
प्रबळनिजभुजींविजित जगदखिलविभवविमतकुलमदतिमिर-
खंडणचंडकरेंमंडित ॥
श्रीशाहराजमार्तंडमुदितचोळमंडळपुंडरीककर्णिका ॥
रघुवीरवर कविराज श्यामराज वर्णी दक्षणद्वारका
राजगोपराजधानी विराजते ॥

## (आ) मेरुस्वामीस्तवन *

निगमवन वसंतें सत्फळाश्रीत केलें
मुनिखगकुळ भावें येत तृप्ती भुकेलें
निजपदपथिकांसी जेथ आनंद वर्ते
अमनसुमनतल्पीं तो सुखात्मा प्रवर्ते ॥ १ ॥

* हस्तलिखित क्र. २०२४, सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर.

* हस्तलिखित क्र. २१५०, सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर. श्लोकाचे आकडे मुळाप्रमाणे ठवले आहेत.

विसरुनि विसरातें ते घनानंद निद्रा
अनुभव-अमृतार्धोन्मीलिता दृष्टि मुद्रा
सुखनिधिसह जागी मुक्तिसौभाग्य भोगी
शिव शिव बहु भाग्यें देखिला मेरुयोगी ॥ १ ॥

श्रुति नयन जयाचे त्या अनंतादिशेषें
वरदकरफणानीं छत्र केलें विशेषें
स्वसुखमुख विभूचें चांद्रसछ्याय जालें
नयनयुगळ माझें तेंच पाहूं उदेलें ॥ २ ॥

तरुणअरुणरूपें आंग वैराग्यतेजें
घवघवित विलासे ब्रह्मभावानुभोजें
उपरि धवळ छाया ब्रह्मभावानुभूतीं
गमत शिवच साक्षात् सत्त्वकर्पूरकांती ॥ ३ ॥

सकळ अनुभवाची सीग साजे शिखा हे
जगहृदयनिरोधूं मध्य कौपीन राहे
त्रिगुणविजयकारी योगपट्टाभिराजें
प्रणवदवनदीक्षा दैसिकीं नित्य माजे ॥ ४ ॥

सहज निज समाधीमाजि हो ग्रंथ होती
सकळ विबुध लोकां वेदसारार्थ देती
श्रवण करिती साधू मस्तकें डोलवीती
प्रगट घडत आहे शामराजीं प्रचीती ॥ ५ ॥

## (इ) ईश्वरभिल्लिणीसंवाद *

जाये(य)मजसी बोलसी कां येकली मी ये वनीं
स्वामि माझा उग्र आहे जाण त्याची कामिनी ॥ १ ॥

कूज देसी शामवाळा मंद चाले गूढ लीळा
चंद्रचूडे शब्दरत्नीं गोविले ते मंगला ॥ २ ॥

तापसीसा भाससी गा नातुडेसी कामयोगा
अंगनेचा संग होतां योग जातो वाउगा ॥ ३ ॥

मन्मथासी वैर केले वस्तु त्याचे काय गेले
भासते जे आजि तेणें मोहो(ह)फांसा गोविले ॥ ४ ॥

इच्छिसी तूं अंगनेला कां प्रियेचा त्याग केला
जाये(य) कांतासंग सेवी फीरसी तूं येकला ॥ ५ ॥

सुंदरीचे नाव पूसे सांग म्हणतां येरि हांसे
चाड नसतां पूससी कां विस्मयो हा होतसे ॥ ६ ॥

सुंदरी ते बोल बोले शंकराचें चीत डोलें
आवरीतां सावरीना विस्मयो हा होतसे ॥ ७ ॥

कामिनीचा योग भारी मोहिला तो मन्मथारी
कामभावें पूससी कां विस्मयो हा होतसे ॥ ८ ॥

अंतरीचा हरुश दाटे बोलतां कीं लाज वाटे
अंबिकेनें पाय दोन्ही वंदिले ते गोमटे ॥ ९ ॥

शंभु अंबे अैक्य जालें तीसि अंकीं बैसवीले
शामराजें पूर्ण भावें दंपतीसी वर्णिलें ॥ १० ॥

---

* हस्तलिखित क्र. २०६१, सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर. सप्तमात्रकावर्तनी (अग्न्यावर्तनी) असलेली गझल स्वरूपाची ही रचना मराठीतील पहिलीच ठरावी.

परिशिष्ट : ३

# पौराणिक व कविकल्पित व्यक्तींची सूचि

प्रस्तुत सूचीत पौराणिक व काल्पनिक व्यक्तिनामांचा समावेश आहे. काल्पनिक व्यक्तिनामांपुढे तशा अर्थाचा स्पष्ट निर्देश केला आहे. पुढील जोड आकड्यांपैकी पहिला आकडा उल्लासाचा असून दुसरा श्लोकाचा आहे.

**अनिरुद्ध** – ५-३६, ९-२३, ९-४९. प्रद्युम्नाचा पुत्र.

**अर्जुन** – ७-४८. पांडवांपैकी एक.

**अष्टकांता** – २-३०. कृष्णाच्या आठ प्रमुख स्त्रिया. रुक्मिणी, भद्रा, लक्ष्मणा, जांबवती, मित्रविंदा, सुदंता, कालिंदी व सत्यभामा.

**इंद्र** – ३-१३, ८-५२. देवांचा राजा.

**इंद्रजित** – ६-११. रावणाचा ज्येष्ठ पुत्र. याचे मूळचे नाव मेघनाद असे होते.

**उर्वसी** – ९-३७. उर्वशी. एक अप्सरा. पुरुरव्याची कांही काळ सहचरी.

**उषा** – ९-४७. बाणासुराची कन्या. प्रद्युम्नपुत्र अनिरुद्धाची पत्नी.

**कर्ण** – ८-३. कुंतीस सूर्यापासून झालेला पुत्र.

**कलावती** – ३-३०. गायनकलेत प्रवीण असलेली एक अप्सरा.

**कालिंदी** – ४-२३, ७-३७. कृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक.

**कालीय सर्प** – २-२७. यमुनेच्या पाण्यात राहणारा भयंकर सर्प. यास कृष्णाने ठार केले.

**कुंभजात** – ५-३१. अगस्त्य ऋषी.

**कौरव** – ७-४८. धृतराष्ट्रपुत्र.

**गरुड** – २-४८, २-५१, ८-१०, २-४८. कृष्णाचे वाहन.

**गोप्रलय** – १-८. वन्हिमुख मुनीचा पुत्र. एक श्रेष्ठ विष्णुभक्त.

**गोभिल** – १-८. गोप्रलयाचा कनिष्ठ बंधू. हाही गोप्रलयाप्रमाणे विष्णुभक्त होता.

**चंद्रलेखा** – २-१७. मनोरमेची सखी. कविकल्पित पात्र.

**चंपकेश** – ४-५. चंपकारण्यात-मन्नारगुडीत-निवास करणारा कृष्ण.

**चित्रध्वज** – ६-४०. असुराकडील एक योद्धा. कविकल्पित पात्र.

**चित्रसेन** – ५-४२, ५-४८, ५-५२, ६-८. एक असुर. विचित्रसेनाचा कनिष्ठ बंधू. काल्पनिक पात्र.

**जांबवती** – ४-१९. कृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक.

**तिलोत्तमा** – ९-३७. विश्वकर्म्याने निर्मिलेली एक सुंदर स्त्री. हिच्या प्राप्तीसाठी सुंदोपसुंदात कलह होऊन त्यांनी परस्परास ठार मारले.

**दंडपाणी** – ६-३९. असुराकडील एक योद्धा. काल्पनिक पात्र.

**नीला** – ४-२२, ७-३७. कृष्णाच्या एका सखीचे नाव. काल्पनिक पात्र.

**पाशपाणी** – ६-५. वरुण.

**प्रद्युम्न** – ५-२१. कृष्णाचा पुत्र. हा पूर्वजन्मी मदन होता.

**बलभद्र** – २-३४. बलराम.

**भद्रा** – ७-३७. कृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक.

**भार्गव** – २-१२. परशुराम. जमदग्नी व रेणुकेचा पुत्र. याने पित्याच्या आज्ञेवरून आईचा वध केला.

**मंजुभाषिणी**–२-४. मनोरमेची सखी. काल्पनिक पात्र.

**मदन** – १-१३. कामदेव. ब्रह्मदेवाचा पुत्र.

**मधु** – १-४२. एक दैत्य. कृष्णाने याचा वध केला.

**मनोरमा** – १-६, १-२०, १-२५, २-३, ३-२०. कृष्णाची प्रेयसी. काल्पनिक पात्र.

**मय** – ६-१७, ८-३५, ८-४२, ८-५०. एक दैत्य.

**मित्रवृंदा** – ४-१७, ४-२४, ७-३७. मित्रविंदा. कृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक.

**मोहनांगी**– ६-१२. चित्रसेनाची पत्नी. काल्पनिक पात्र.

**मोहिनी** – ६-१२. विचित्रसेनाची पत्नी. काल्पनिक पात्र.

**रणदुर्मद** – ६-४०. असुराकडील एक योद्धा. कविकल्पित पात्र.

**रथांगपाणि** - २-५७. विष्णूचे एक नाव.

**रंभा** – २-२२, ९-३७. एक अप्सरा.

**रमा** – १-३१. लक्ष्मी.

**रसिकेंद्र** – २-३३, २-३५, ५-१९. मनोरमेचा पती. काल्पनिक पात्र.

**राजगोपाल** - १-४८, २-४७, ३-२३, ९-६२. मन्नारगुडीच्या कृष्णाचे नाव.

**राम** – १-९. दशरथपुत्र.

**रुक्मिणी** – ३-१९, ४-१८, ४-३१, ९-१७. कृष्णाची पत्नी.

**रोहिणी** – २-३. चंद्राची पत्नी.

**लोकांतक** – ६-४०. असुराकडील एक योद्धा. कविकल्पित पात्र.

**वरुण** – ८-५६. दिक्पालांपैकी एक.

**वसिष्ठ** – ८-६९. एक प्रसिद्ध ऋषी.

**विचित्रकेतु**– ६-३९. असुराकडील योद्धा. काल्पनिक पात्र.

**विचित्रसेन**– ५-४१, ६-८, ६-१९, ८-३०, ८-५४. असुरप्रमुख. कविकल्पित पात्र.

**वित्तेश** – ६-५. कुबेर.

**विधी** – १-२. ब्रह्मदेव.

**विश्वामित्र** – ८-६९. एक प्रसिद्ध ऋषी.

**वैवस्वत** – ६-५. यम.

**शची** – ६-६, ८-५४. इंद्राची पत्नी.

**शतमख** – ८-७१. इंद्र.

**शिव** – ३-३७. शंकर.

**शुक (लीलाशुक)**– १-४४, २-४८, २-५४, ४-२६, ७-३१, ८-१२. कृष्णाचा दूत शुकपक्षी.

**शेष** – ५-५८. ह्यास सहस्रफणा असून तो आपल्या डोक्यावर पृथ्वी धारण करतो.

**संग्रामशूर** – २-३५, ५-१८, ५-२१, ५-३६. रसिकेंद्राचे दुसरे नाव.

**सत्यभामा** – २-५०, ४-१७, ४-४२, ७-२३. कृष्णाच्या अष्टनायिकांपैकी एक.

**सनक** – १-१५, ८-७१. ब्रह्मयाचा मानसपुत्र. हा विष्णूचा अंश होता.

**सात्यकी** – ५-२, ५-२१, ५-५२. कृष्णाकडील एक योद्धा. थोर सेनानायक.

**सुंदोपसुंद** – १-२९. निकुंभदैत्याची मुले.

**सुमति** – ५-९, ५-२०, ६-२१. बलरामाचा प्रधान. काल्पनिक पात्र.

**सुलोचना** – ६-११. इंद्रजिताची पत्नी.

# संदर्भ-ग्रंथ

## मराठी

१. **महाराष्ट्र सारस्वत** म. सा.
वि. ल. भावे, शं गो. तुळपुळ, आवृत्ती ५. पुणे, १९६३.

२. **दमयंती-स्वयवर** (रघुनाथ पंडित) द. स्व.
संपादक : अ. का. प्रियोळकर, मुंबई, १९३५.

३. **नलदमयंती-स्वयंवराख्यान** (रघुनाथ पंडित)
संपादक : श्री. ना. बनहट्टी, सुविचार प्रकाशन नागपूर, १९५४.

४. **रुक्मिणीहरण** (सामराज)
संपादक : गो. वि. तुळपुळे, कर्नाटक पब्लिशिंग हाउस, मुंबई, १९४०.

५. **श्रीकृष्णमंजरी** (प्रतापसिंह) श्री. मं.
संपादक : गो. नागराजराव, सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर, १९५७.

६. **सुभद्रास्वयंवर** (निरंजनमाधव)
संपादक : रा. चिं. ढेरे, नीलकंठ प्रकाशन, १९६७.

७. **रामायण-युद्धकांड** (रामदास), श्रीरामदासाचे समग्र ग्रंथ
मुद्रक व प्रकाशक, शंकर नरहर जोशी, चित्रशाळा, पुणे, १९३२.

८. **शरभेंद्र तीर्थावळी** (श्री शिव)
संपा. कृष्णस्वामी महाडिक रावसाहेब, सरस्वती महाल ग्रंथालय,
तंजावर, १९५२

९. **कथाकल्पतरू** (उत्तरार्ध) (कृष्णयाज्ञवल्की)
दा. सा. यंदे, मुंबई १९२७.

१०. **तेलुगु साहित्याचा इतिहास**
दिवाकर्ला वेंकटावधानी, अनुवादक, व्यं. द. टिळक.
मराठी साहित्य परिषद, आंध्र प्रदेश, हैदराबाद, १९६५.

११. **मराठी आख्यान-कविता :** एक अभ्यास
डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, मुंबई मराठी साहित्य संघ, मुंबई, १९७०.

१२. **तंजावरचे मराठी राजे**
विनायक सदाशिव वाकसकर, दामोदर सावळाराम आणि कंपनी, १९३३

१३. **प्राचीन चरित्र कोश**
सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, पुणे, १९३२.

१४. **भाषाप्रकाश** (रामकवि)
संपादक : डॉ. शं. गो. तुळपुळे, पुणे विद्यापीठ, पुणे, १९६२.

१५. **मराठी भाषेचा तंजावरी कोश**
संपादक : डॉ. शं. गो. तुळपुळे, व्हीनस प्रकाशन, पुणे, १९७३.

१६. **मराठी ग्रंथांची बयाजवार यादी** भाग १ ते ४
सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर.

१७. **एकनाथ महाराज यांची अभंगाची गाथा**
चित्रशाळा प्रेस, पुणे, १९५६.

## संस्कृत

१. **श्रीमन्महाभारत**

२. **श्रीमद्‌भागवत**
गीता प्रेस, गोरखपूर, सं. २०२८.

३. **श्रीहरिवंशपुराण**
संपादक : वे. शा. सं. विष्णुशास्त्री बापट, १९११.

४. **अग्निपुराण**

५. **मेघदूत** (कालिदास)
संपादक : मन्नालाल अभिमन्यु, बनारस, २०११.

६. **कादंबरी** (बाण)
संपादक : मो. रा. काळे, मोतीलाल बनारसीदास, दिल्ली, १९६८.

७. **गीतगोविंद** (जयदेव)
संपादक : आनंद साधले, मॅजेस्टिक प्रकाशन, मुंबई, १९६८.

८. **ब्रह्मवैवर्तपुराण**

९. **नैषधीयचरितम्** (श्रीहर्ष)

**तेलगु**

१. **राजगोपालविलासमु** (चेंगल्वा कालकवि)
संपा. एन्. वेंकटराव, सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर, १९५१.

२. **प्रसन्नराघवनाट्यप्रबंधमु** (बोडुचर्ला चिन्नतिम्मय्यामंत्री)
संपा. डॉ. वी. रामराजू, हैदराबाद, १९६२.

३. **शृंगारनैषधम्** (श्रीनाथ)
संपा. श्री वेदमु वेंकटराय शास्त्री, १९६१.

४. **पांडुरंग-माहात्म्य** (तेनालि रामकृष्ण)
संपा. श्री रंगाचार्युलु, १९३४.

५. **राजशेखरचरित्र** (मादयगारी मल्लन्ना)
संपा. पुट्टपर्ति नारायणाचार्युलु, १९६७.

१. **तेलुगु साहित्यका इतिहास**
संपा. के. लक्ष्मीरंजनम्, हिंदी प्रचार सभा, हैदराबाद, १९६७.

२. **हिंदी और तेलुगु कृष्णकाव्योंका तुलनात्मक अध्ययन**
डॉ. एन्. एस्. दक्षिणामूर्ति, हिंदी साहित्य भांडार, लखनऊ, १९६७.

**इंग्रजी**

1. Studies in Kalapurnodayam, G. V. Krishna Rao, 1956.
2. History of Telugu Literature, G. V. Sitapati, Sahitya Academy, New Delhi, 1968.
3. The Imperial Gazetteer of India, Vol. xvii, (New edition), 1908.
4. Archaeological Survey of South India-Lists of Antiquarian Remains in the Presidency of Madras, Vol. I, Compiled by Robert Sewell, 1882.
5. An Indian Ephemeris, Pillay.

## नियतकालिके

१. **मराठी संशोधन पत्रिका,** मुंबई, वर्ष १६, अ. २, १९६९.
(प्रतापसिंहेंद्रकृत पार्वतीकल्याण, संपा. : प्रा. सौ. माया सरदेसाई)
पा. क.

२. **मराठी स्वाध्याय-संशोधन-पत्रिका,** अंक ७ उस्मानिया विद्यापीठ, हैदराबाद.
(प्रतापसिंहेंद्रविरचित जानकीसुखोल्लास, संपा. प्रा. सौ. माया सरदेसाई)

३. **सरस्वती महाल ग्रंथालयाचे नियतकालिक,** Vol. XXIII, No. 1, 1969
(श्री शरभेंद्रभूपालकृत राधाकृष्णविलासनाटक) ग. कृ. वि.

४. **सरस्वती महाल ग्रंथालयाचे नियतकालिक,** Vol. XIX, Nos. 1, 2, & 3 1966.

५. **विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक,** नागपूर, १९६७.

## हस्तलिखिते (सरस्वती महाल ग्रंथालय, तंजावर)

क्र. ८२१, ९५६, २०२४, २०६१, २०६२ (रुक्मांगद-चरित्र)

रु. च., २०८४, २१५०, २२०६ व २२१३.

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| १ | १४ | मिलद्दिव्याक्ष | मिळद्दिव्याक्ष |
| ३ | २३ | अंगीं | आंगीं |
| ४ | २ | महत्त्वें | महत्वें |
| ८ | २३ | कुर्वाळिता | कुर्वाळिला |
| ११ | २ | क्लोशार्ह | क्लेशार्ह |
| १४ | १७ | कालीय | काळीय |
| १८ | १३ | खाद्यावरि | खांद्यावरि |
| २६ | १३ | कल | कल(ळ) |
| ४८ | १९ | एक काळें | एककालें |
| ५७ | ११ | वदनीं | वदनी(ली) |
| ७१ | ९ | क्षीरनिधिनें | क्षी(क्षा)रनिधित्तें |
| १२६ | २० | स्व:च्या | स्वत:च्या |

**RAJGOPALVILAS**

of Shyamraj

Edited by

Manik Dhanpalwar

Lecturer in Marathi,

Osmania University, Hyderabad

Other manuscripts critically edited and Published by the same author.

1. **Angada - Shistai**
   (Krishnadas Mudgal) 1969.
2. **Pundalik - Charitra**
   (Kanha Trimaldas) 1972.
3. **Girija - Sainvar**
   (Akhandadas) 1973.

छापत आहे.

**साहित्य - चिंतन**

(साहित्यविषयक निबंध व
टीकालेखांचा संग्रह)

Under - Print

**Sahitya - Chintan**

(Collection of critical essays
on literary topics)